॥ श्रीविठ्ठलप्रसन्न ॥

# श्रीएकनाथमहाराजांचें

## संक्षिप्त चरित्र

आइके जेथ वाचा विसवे । ते साधुकथा ॥

—ज्ञानेश्वरी अ० ९-१८७


संपादक

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.

'मुमुक्षु' कर्ते, पुणें.



प्रकाशक

ए. सी. भट आणि मंडळी, बुधवार पेठ, पुणें.

मुद्रक

बाळकृष्ण विष्णु साठे,

पुणें 'यशवंत' प्रेस.

पौष शुद्ध प्रतिपदा शके १८३२, जानेवारी सन १९११.

किंमत पांच आणे.

# अनुक्रमणिका.





॥ श्रीरुक्मिणीपांडुरंगाभ्यांनमः ॥

# प्रस्तावना.

१ श्रीएकनाथमहाराजांचें हें अल्पचरित्र महाराष्ट्रवाचकांस मी आज सादर करीत आहे. नाथांचें विस्तृत चरित्र लिहिण्याचा पहिला विचार कांहीं वेळ दूर ठेविला आहे. सत्कवि **श्रीमोरोपंत** पराडकर यांचें साविस्तर **'चरित्र व काव्यविवेचन'** हा ६०० पृष्ठांचा ग्रंथ मी दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलेला रसिकांच्या पुढें आहेच. त्याच नमुन्यावर एकनाथमहाराजांचें सविस्तर चरित्र लिहिण्यास मीं हातीं घेतलें असून त्यांतील २।३ काव्यविवेचनपर प्रकरणें लिहूनही तयार झालीं आहेत. श्रीज्ञानेश्वर, श्रीनामदेव, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम व श्रीरामदास ह्या साधुपंचायतनाचीं साग्र चरित्रें मोठ्या प्रमाणावर लिहिण्याचा माझा मनोदय पहिल्यापासून होता व अजूनही आहे; तथापि त्या मोठ्या प्रमाणावर होणाऱ्या चरित्रांच्या पूर्वी आबालवृद्धांस, लहानथोरांस व गरीबश्रीमंतांस–सर्वांस–संग्राह्य होतील अशीं बोधप्रद, आनंददायक व सुबोध भाषेंत लिहिलेलीं अल्पचरित्रें प्रसिद्ध करण्याविषयीं मला कित्येक मित्रांनीं फार आग्रह केला व तीच श्रीहरीची आज्ञा असें मानून मी ह्या कामास प्रवृत्त झालों !

२ हें एकनाथमहाराजांचें चरित्र आधीं प्रसिद्ध होत आहे व यानंतर ज्ञानेश्वरमहाराज, नामदेवमहाराज, तुकाराममहाराज, रामदासस्वामी इत्यादि विख्यात साधूंचीं चरित्रें क्रमाक्रमानें लिहून प्रसिद्ध करण्याचा माझा संकल्प आहे तो सत्यसंकल्पाचा दाता नारायण पूर्ण करो. ७।८ महिन्यांत ही माला संपूर्ण व्हावी असें वाटतें ! प्रस्तुत चरित्र पांच आठवड्यांत लिहून झालें यावरून हा अंदाज बांधला आहे. श्रीहरीचे उपासक व जीवांचे परममित्र जे संत त्यांच्या वाक्सुधासरितेंत अखंड मज्जन करावें व त्यांचे गुण गात व ऐकत आपल्या

मूळपदावर आनंदानें जावें अशी आवड श्रीहरीनेंच उत्पन्न केली असून तिचा परिपोषकही तोच आहे. संत हे जीवांचे मायबाप आहेत. ज्ञानेश्वरी, नाथभागवत, अमृतानुभव, दासबोध, नामदेवतुकारामादिकांचे अभंग व हजारो पदें इत्यादि ग्रंथरूपानें संतच अवतरले आहेत. संतसंगतींत मनोमळ धुवून जातो, मन निश्चळ होऊन हरिचरणीं जडतें, विषयांची बाधा काय पण आठवणही होत नाहीं, संसार सारभूत व आनंददायक वाटतो, 'मी' पण मुरून सर्वात्मभावाची जागृति होतें व अवघें हरिमय होऊन चिदानंदानें विश्व भरून जातें!! संत प्रपंचाशी पडलेली मिठी सोडवतात व स्वस्वरूपाच्या सुखमय सिंहासनावर नेऊन बसवितात. संतांची वाणी जिभेवर नाचत राहिल्यानें आंतबाहेर प्रकाश होतो; व विचार जागृत होऊन अज्ञान मावळतें. सत्संग हेंच मोक्षाचें द्वार आहे. संत व संतांचे ग्रंथ यांत लवमात्र भेद नाहीं. असो. संतांच्या अपार उपकारांचे अंशतः उतराई होण्याचा उत्तम उपाय ह्मणजे त्यांच्या उपदेशाचा व चरित्राचा अधिक प्रसार करावा हाच आहे. सत्संगांत, संतांच्या ग्रंथांत व संतांच्या चरित्रांत आपण रंगावें आणि रंगवावें, भक्त्यानंद चाखावा आणि चाखवावा, आणि 'एकमेकां करूं साह्य । अवघे धरूं सुपंथ' ह्या तुकोबारायांच्या उक्तीप्रमाणें वक्तेश्रोते व लेखकवाचक ह्या सगळ्यांनीं मिळून हरिप्रेमानंद घ्यावा आणि द्यावा आणि हा सारा ब्रह्मगोळ हरीच्या व हरिभक्तांच्या प्रेमळ कथांनीं दुमदुमून भरावा असें मला फार फार आवडतें.

२ मराठी संतकवींचीं चरित्रें लिहिणारानें तीन गोष्टींचा नीट विचार केला पाहिजे. (१) प्रथम पूर्वपरंपरागत विचारसरणी आपलीशी होऊन धर्मविचारांचें यथार्थ स्वरूप त्याच्या ध्यानांत आलें पाहिजे. बहुतेक महाराष्ट्रसंत भागवतधर्मानुयायी म्ह० वारकरी असून पंढरीच्या वारकरी सांप्रदायांत मिसळून गेल्याशिवाय त्या सांप्रदायाचें शुद्ध स्वरूप व परंपरागत अर्थसंगती ही त्याच्या ध्यानांत येणार नाहींत. सांप्रत सुशिक्षित लोकांत पूर्वपरंपरेचा अनादर व परंपरेला सुटलेल्या विचित्र धर्मकल्पना यांचा फैलाव झाल्यामुळें आपापल्या तर्कानें साधूंच्या ग्रंथांचे

व अभंगांचे हवे तसे अर्थ करण्याचें खूळ बरेंच माजलें आहे. संतांचे ग्रंथ नवीन विचारांच्या चष्म्यानें लावावयाचा ते प्रयत्न करीत आहेत, पण सांप्रदायिक लोकांप्रमाणें ह्या स्वतंत्र विचारांच्या लोकांना पूर्वापार भासणारे विरोध मोडून ग्रंथांतील अनेक उद्गारांची एकवाक्यता करितां येत नाहीं. पूर्वपरंपरा अंधळेपणानें घ्यावी आणि स्वबुद्धीनें विचारच करूं नये असें माझें ह्मणणें नाहीं; तथापि पूर्वपरंपरा नीट समजून घेतल्याशिवाय स्वबुद्धीचें प्रस्थ माजवीत बसूं नये एवढेंच माझें ह्मणणें आहे. 'वारकरी लोकांत आहे काय? ते नुस्ते टाळकुटे आहेत, ते पंगु आहेत, बावळे व भोळवट आहेत' असें ह्मणून त्यांना झिडकारून आपल्याच तर्कावर आरूढ झालेले अहंमन्य विद्वान् आज कांहीं आहेत; तथापि हें मी स्वानुभवाच्या खात्रीनें सांगूं शकतों कीं, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, नाथभागवत, दासबोध, तुकारामादिकांचे हजारो अभंग यांचा पूर्वापरसंबंध लावून उत्कृष्ट उलगडा करणारे मर्मज्ञ सांप्रदायिकांतच तुम्हांस सांपडतील! सांगण्याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं, संतांचे ग्रंथ सांप्रदायपरंपरेनें नीट समजून घेतल्याशिवाय, त्यांतील विचारांची खरी ओळख होणार नाहीं आणि विचारांची ओळख झाल्यावरही त्या विचारानुरूप अनुष्ठान (आचरण) झाल्याशिवाय ('अर्जुना तूं परिससी। आणि परिसोनि अनुष्ठिसी'—ज्ञाने० अ० ५-१६९) त्यांचें खरें मर्म लक्षांत येणार नाहीं (२) भावबळानें संतांचीं रहस्यें समजून त्यांचे ग्रंथ उलगडतील, तथापि चरित्रकाराच्या अंगीं वागर्थसौंदर्य ह्म० शब्दसौंदर्य व अर्थसौंदर्य (The beauty of expression and thought) कळण्याइतकी रसिकताही पाहिजे. कोठें कोणती कल्पना सुरेख आहे, कोठें कोणता शब्दसमूह समर्पक आहे, कोठें कोणता रस किंवा अलंकार उत्कृष्ट साधला आहे हें त्या त्या स्थळीं जाणून त्यास तन्मय होतां आलें पाहिजे. (३) तिसरी महत्वाची गोष्ट ह्मणजे चरित्रकाराला इतिहासदृष्टि पाहिजे, स्थलकालांचा पूर्वापरसंबंध त्यास कळला पाहिजे. तात्पर्य, चरित्रकार सांप्रदायिक उर्फ भाविक, काव्यमर्मज्ञ उर्फ रसिक व इति-

हासज्ञ उर्फ चिकित्सक असा गुणत्रयसंपन्न असेल तर संतचरित्रकाराचें काम तो सर्वोत्कृष्ट करील. भाविकता, रसिकता व चिकित्सकता ह्या तीन गुणांची कल्पना **महिपतबावा, विष्णुशास्त्री चिपळोणकर व राजवाडे** हीं तीन नावें घेतांच होणार आहे ! महिपतबावांत कालविपर्यासादि दोष सांपडतात, पण त्यांची प्रेमळ व रसाळ वाणी संसारदुःखें विसरवून व रजतमांची झाडणी करून आणि सत्वगुणाचा चित्तांत उदय करून भक्तिमार्गाला लावते. राजवाडे विद्वान्, शोधक, उद्योगी, स्वार्थत्यागी, व बुद्धिवंत म्हणून चार विद्वानांत मान्य होतील व शास्त्रीय शोधांत त्यांचे उपकार आठवतील पण त्यांची कर्कश, कठोर, व भेदक पद्धत प्रेमळांस नकोशी वाटेल. मालाकार मध्यस्थ राहतील, म्ह० ते तर्कासाठी रसपूर्ण गोष्टींचा निषेध करणार नाहीत व अंधश्रद्धेसाठी हव्या त्या कथाही गिळणार नाहींत ! महिपती प्रेमळांना रंगवतील, शास्त्रीबुवा प्रौढ विद्यार्थ्यांना रंजवतील व राजवाडे विद्वानांना चकवतील ! महिपतींचा रसाळपणा, मालाकारांची मार्मिकता व राजवाड्यांचा चिकित्सकपणा ह्या तीनही गुणांचें योग्य मिश्रण ज्या संतचरित्र-कारांत झालेलें आढळेल तो भाविक, रसिक व पंडित ह्या तीनही वर्गांस मान्य होईल ! असा पुरुष केव्हां उत्पन्न होईल तो होवो, पण वरील तीन गुणांचे अल्पांश माझ्या ह्या संतचरित्रमालेंत आढळतील तर त्यांचें वाङ्मयदृष्टीनेंही कांहीं विशेष कार्य झालें असे होईल.

४ प्रस्तुत नाथचरित्राला मुख्य आधार केशवबुवा व महिपतबुवा यांच्या चरित्रांचा व नाथांच्या ग्रंथांचा आहे. सहस्रबुद्धे यांचें गद्यात्मक चरित्र केवळ महिप-तींच्या आधारें लिहिलें आहे. त्यानंतर केशवबुवांचें चरित्र प्रसिद्ध झालें आहे. केशवबुवा नाथसांप्रदायी असून त्यांनीं देवगडावरच शके १६८२ मध्यें आपलें ३१ अध्यायांचें सुरस 'नाथचरित्र' रचिलें. महिपतींनीं भक्तविजय (अ० ४५।४६) व भक्तलीलामृत ( अध्याय १३–२४ ) ह्या दोन ग्रंथांत तें वर्णिलें आहे, पण भक्तविजयांत त्याचा संक्षेप असून भक्तलीलामृतांत विस्तार आहे. भक्तविजय शके १६८४ मध्यें लिहिला गेला व भक्तलीलामृत शके १६९६ मध्यें समाप्त झाला

आहे. केशवबोवा यांचेंच चरित्र सांप्रदायशुद्ध व पहिलें असून महिपतबो-वांनीं संतलीलामृतांत केशवबुवांचाच कथानुक्रम तसाच घेतला आहे. केशव-कृत नाथचरित्र व महिपतींच्या भक्तलीलामृतांतले १२ अध्याय शेजारीं ठेवून पाहिलें ह्मणजे चांगलें लक्ष्यांत येतें कीं केशवांचा ग्रंथ पुढें ठेवूनच महिपतींनीं वर्णन केलें आहे ! महिपतींनीं वरील चरित्राला २३५८ ओव्या दिलेल्या असून केशवानें २६४४ दिल्या आहेत. एकंदरींत केशवकृत नाथचरित्र महि-पतींच्या पूर्वींचें आहे. ह्या दोन चरित्रांचा मुख्य आधार धरून व नाथमहा-राजांच्या स्वतःच्या उक्ति जागोजाग प्रमाणार्थ देऊन प्रस्तुत चरित्रग्रंथ तयार केला आहे. दासोपंत, मुक्तेश्वर, कृष्णदयार्णव, मोरोपंत इत्यादिकांचे क्वचित् आधार घेतले असून शेवटीं **'स्तुतिसुमनांजलि'** म्हणून जें १२ वें प्रकरण जोडलें आहे त्यांत नाथांच्या पश्चात् झालेल्या कवींनीं नाथांबद्दल जे प्रेमोद्गार काढले ते एकत्र संग्रहीत केले आहेत. केशव व महिपति यांनीं वर्णिलेल्या नाथचरित्रांतील ठळक गोष्टी लोकांत सर्वत्र कशा पसरल्या होत्या हें यावरून चांगलें लक्षांत येतें. ह्या पुस्तकांत नाथाच्या ग्रंथांतले नाथांचे उद्गार जागोजाग विपुल दिले असून शक्य तेथें तेथें नाथांचे मनोगत नाथांच्याच मुखांतून प्रगटविलें आहे ! नाथांनाच आत्मचरित्र सांगावयास लावलें असून नाथांचें चरित्र व नाथांचे ग्रंथ यांचा मेळ यांत दाखविला आहे, हा या ग्रंथाचा मुख्य विशेष आहे. **पहिल्या** प्रकरणांत नाथांचे पणजे भानुदास यांचें समग्र चरित्र दिलें आहे त्यासुद्धां भानुदासांचें चरित्र व भानुदासांचे अभंग यांचा मेळ घातला आहे. **दुसऱ्या** प्रकरणांत नाथांचें बाळपण वर्णिलें असून तें बालांना फार बोधप्रद होणारें आहे. **तिसऱ्या** प्रकरणांत नाथांचे गुरु जनार्दनस्वामी यांची हकीकत, नाथांच्या गुरुसेवेचा प्रकार व स्वामींना सगुणसाक्षात्कार कसा झाला याचें नाथां-च्याच शब्दांनीं वर्णन, इतके प्रकार आले आहेत. **चवथ्या** प्रकरणांत नाथांना दत्तदर्शन झाल्याची गोष्ट सांगितली असून नाथांचे दत्तमानसपूजेवरचे उत्कृष्ट अभंग दिले आहेत व त्याच्या अनुष्ठानाचा प्रकार वर्णिला आहे. **पाचव्यांत**

नाथांच्या तीर्थयात्रा वर्णिल्या असून नाथ व चक्रपाणी यांच्या वियोगाच्या व भेटीच्या प्रेमळ प्रसंगांचें वर्णन केलें आहे. **सहावें** प्रकरण विशेष महत्वाचें आहे. त्यांत नाथांचा गृहस्थाश्रम, नाथांच्या भार्येचें सद्वर्तन, नाथांचा नित्यक्रम, नाथांची कीर्तनपुराणांची पद्धती, निंदकछलकांविषयीं नाथांचें उदारपणाचें वर्तन, त्यांची समता, उपासना इत्यादि गोष्टींचें विवरण केलें आहे. **सातव्या** प्रकरणांत 'पैठणच्या षष्ठीचें' महत्व कां आहे तें सांगितलें असून नाथांच्या गुरुभक्तीचें मर्म यांत पुन्हां विस्तारानें सांगितलें आहे. नाथचरित्रांत गुरुभक्ति हा त्यांचा मुख्य सद्गुण असल्यामुळें गुरुभक्तीचें येथें विशेष विवेचन केलें आहे. सर्व ग्रंथांत प्रसंगोपात्त सांगितल्या गेलेल्या गोष्टींशिवाय ज्या विशेष महत्वाच्या नाथांच्या संबंधाच्या आख्यायिका महाराष्ट्रभर प्रसिद्ध आहेत त्यांचा संग्रह **आठव्या** प्रकरणांत केला आहे. केशव व महिपति यांनीं न दिलेल्या पण सुप्रसिद्ध अशा २।३ गोष्टी मी यांत जास्त दिल्या आहेत. साधुत्वाबद्दल नाथ कसे मान्य झाले तें या प्रकरणांवरून समजतें. भगवंतांनीं नाथांच्या घरीं बारा वर्षें राहून सेवा केली ही गोष्ट इतर समकालीन संतांचे पुरावे व नाथांची स्वतःची साक्ष देऊन **नवव्या** प्रकरणांत सप्रमाण सांगितली आहे. **दहाव्या** प्रकरणांत नाथांनीं कोणत्या प्रसंगीं पंढरी, आळंदी व काशी येथील यात्रा केल्या व त्या कशा केल्या हें सांगितलें असून नाथांच्या ग्रंथांचा थोडक्यांत विचार केला आहे. ह्या प्रकरणांत काशीच्या विद्वानांनीं नाथांचा प्रथम कसा छळ केला व नंतर त्यांच्या सद्वर्तनाला भुलून त्यांच्या भागवताचा कसा जयजयकार केला हें सांगितलें असून दासोपंतांची व नाथांची भेट, ज्ञानेश्वरमहाराजांचें नाथांस दर्शन व गावबाचें चरित्र ह्या गोष्टी संक्षेपानें सांगितल्या आहेत. **अकराव्या** प्रकरणांत नाथांना अपत्यें कितीं होतीं हें सांगितलें आहे व त्यांचा नातु मुक्तेश्वर व मुलगा हरिपंडित यांची ओळख करून दिली आहे, आणि नाथ व हरिपंडित यांच्यांत विरोध व समेट कसा झाला हें सांगून त्यांतच नाथांच्या निर्याणसमयाचें वर्णन केलें आहे व **बाराव्यांत** नाथांचें गौरव थोरांनीं कसें केलें

तें सांगितलें आहे. ह्या सर्व गोष्टी हीं बारा प्रकरणें वाचल्यानंतर विशेष रीतीनें लक्षांत येणार आहेत. गृहस्थाश्रमांत राहून नाथांनीं ब्रह्मस्थिति अभंग ठेविली. नाथांसारखें मनोहर चरित्र नाथांचेंच. याला दुसरी तोड नाहीं. श्रीक्षेत्र पैठणास मी पंधरा दिवस राहिलों होतों, तितक्या अवधींत जी माहिती मिळाली तिचाही हें चरित्र लिहितांना मला पुष्कळ उपयोग झाला आहे. मागें सांगितल्याप्रमाणें भाविक, रसिक व चिकित्सक ह्या तिघांतच्या प्रमुख गुणांचा आदर करून ही चरित्रमाला मी गुंफणार आहे तरी हरि, हरिभक्त व हरिनाम यांच्या विषयीं आपला व आपल्या वाचकांचा प्रेमादर वाढावा व संतचरित्रांच्या आरशांत आपलें निजरूप आपणांस न्याहाळून घेतां यावें हा मुख्य हेतु मनांत धरून ही चरित्रमाला गुंफावयास मी प्रारंभ केला आहे. आत्मशुद्धीचें याहून दुसरें साधन मला तरी दिसत नाहीं. श्रवण, मनन, व निदिध्यास ह्या सर्वांचें फळ ह्या संतांच्या संगतींत प्राप्त होतें. साधुकथा गाणें जीवाला आवडतें, त्यांत आत्मसंशोधन होतें त्यानें हरिप्रेम बळकट होऊन निश्चयाचें ब्रह्मज्ञान प्राप्त होतें. तत्वज्ञानाचे ग्रंथही कोणाला रुक्ष वाटतील, पण संतचरित्रांची गोडी सर्वांसच अविट आहे. ब्रह्मज्ञान संतरूपानें प्रत्यक्ष झालें म्हणजे त्याला गोडी कांहीं अनुपम येतें. असो. संतचरित्रें गाण्याची जी मी आवड धरिली ती श्रीहरीनें निरंतर सन्निध राहून पुरवावी अशी त्याच्या पायीं नम्र प्रार्थना करून व आपल्या चरणांचें प्रेम निरंतर द्यावें अशी नाथमहाराजांची प्रार्थना करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या परमपवित्र चरित्राकडे वळतों !

पोष शुद्ध १ शके १८३२<br>पुणें, 'मुमुक्षु' कचेरी.

संतदासानुदास<br>**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# श्रीएकनाथ महाराजांचें चरित्र.

## १ नाथांचे पणजे भानुदास.

शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥

–श्रीतुकाराम.

१ भानुदासकुलगौरव. २ भानुदासावर भानूचा–सूर्यनारायणाचा–अनुग्रह. ३ चाटेपणाचा धंदा व भानुदासांची सत्यनिष्ठा. ४ छळ व हरिकृपा. ५ भानुदासांची हरिभक्ति व अभंगवाणी. ६ भानुदासांचे गुण व उपदेश. ७ अनागोंदीचा राजा कृष्णराय. ८ अनागोंदीहून श्रीविठ्ठलमूर्तीस भानुदास घरत आणतात. ९ भानुदासांचा जयजयकार. १० नाथांचा भानुदासांविषयीं पूज्यभाव.

१ श्रीएकनाथ महाराजांचे पणजे भानुदास महाराज हे आश्वलायन सुत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांचा जन्म शके १३७० च्या सुमारास पैठणक्षेत्रीं झाला. पैठण उर्फ प्रतिष्ठान हें शककर्ता जो शालिवाहन उर्फ सातवाहन याच्या राजधानीचें शहर असून तेव्हांपासून हें संस्कृतविद्येचें माहेरघर बनून राहिलें होतें. पैठणास 'दक्षिणची काशी' असें म्हणत चार वेद, सहा शास्त्रें व

अठरा पुराणें यांचा अभ्यास पैठणसारखा सर्व दक्षिणेंत दुसऱ्या कोठेंही होत नव्हता. ज्ञानेश्वरप्रभृति भावंडांना शुद्धिपत्र आणण्याकरितां आळंदीकर ब्राह्मणांनीं तेराव्या शतकांत पैठणासच पाठविलें होतें. अशा ह्या विद्यानगरींत भानुदासांचा जन्म एका कुलीन घराण्यांत झाला. भानुदास हे दामाजीपंतांचे समकालीन असून त्यांनीं शके १३९०-९७ मधला दामाजीपंतांचा दुष्काळ पाहिला होता. भानुदासांच्या वेळीं पंढरपूरचा भागवत धर्म पैठणांत फारच थोड्या घराण्यांत माहीत होता. अशा थोड्या भागवतधर्मी घराण्यांपैकींच भानुदासांचें घराणें होतें, असें त्यांच्याच एका अभंगांतील ' आमुचिये कुळीं पंढरीचा नेम । मुखीं सदा नाम विठ्ठलाचें ' ह्या चरणावरून उघड होतें. भानुदासांच्या पूर्वजांची विशेष माहिती मिळत नाहीं, तथापि भानुदासांच्या अंगीं बाळपणींच जे गुण प्रकटले त्यावरून त्यांच्या सच्चरित्राचा बराच बोध होतो. ज्या घराण्याला शुद्धाचरणाचें बाळबोध वळण लागलेलें असतें त्यांत निपजलेला व वाढलेला पुरुष बहुधा सदाचार संपन्नच निघालेला आढळतो. भानुदास, भानुदासांचा पणतु एकनाथ व एकनाथांचा नातु मुक्तेश्वर असे तीन कुलदीपक ज्या घराण्यांत शेंदीडशें वर्षांच्या अवधींत निर्माण झाले त्या घराण्याच्या शुद्धपरंपरेविषयीं आणखी दुसरें कोणतें प्रमाण हवें? नाथासारख्या सत्पुरुषाचा जन्म कांहीं भलत्यासलत्या कुळांत होत नसतो.

ईश्वरनिष्ठा, सदाचारसंपन्नता, सत्यप्रीति, एकनिष्ठता इत्यादि सद्गुण ज्या घराण्यांत अनेक पिढ्यांचे मुरत आलेले असतात त्यांतच एकनाथासारखा अद्वितीय महात्मा जन्मास येतो. अनेक पिढ्यांचें तप अशा महापुरुषावताररूपानें फळास येतें. असो. ज्या सज्जनाच्या भक्तीमुळें नाथांचा वंश भगवंतास प्रथम प्रिय झाला, त्या नाथांच्या प्रपितामहाच्या—भानुदासांच्या—चरित्राचा आपण ह्या प्रकरणांत विचार करूं.

२ भानुदासाचा व्रतबंध झाल्यानंतर रीतीप्रमाणें चार अक्षरें यावींत अशा बुद्धीनें त्याच्या बापानें त्याला लौकिक विद्या शिकविण्यास आरंभ केला; पण हरिभक्तीचे दृढतर संस्कार ज्याच्या बुद्धीवर पूर्वसुकृतानें उमटले होते त्याला लौकिक विद्येची गोडी लागेना बापानें पुष्कळ सांगून सवरून धाकदपटशा देऊनही पाहिलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. एके दिवशीं बाप असाच रागे भरला असतां वयाच्या १० व्या वर्षींच भानुदास रुसून गांवाबाहेर एक पडकें देऊळ होतें त्याच्या तळघरांत जाऊन लपून बसला! हें तळघर अंधारांत असून ओसाड होतें. त्यांत सूर्यनारायणाची एक मूर्ति होती. भानुदास त्या तळघरांत सात दिवस लपून बसला. बापाला मुलाचा शोध न लागल्यामुळें तो हिंपुटी होऊन शोक करीत बसला. भानुदासानें सूर्यनारायणाचे

चरण दृढ धरिले, प्रेमाश्रूंचें त्यांस स्नान घातलें व सद्गदित अंतःकरणानें त्याची करुणा भाकली. दोन दिवसांचे उपास घडल्यावर तिसरे दिवशीं सूर्योदयीं एक दिव्य ब्राह्मण दुधाचें भांडें घेऊन त्यापुढें प्रकट झाला व ' मी विश्वचक्षु सूर्यनारायण आहे, तुझ्या पित्यानें माझी बहुत काळ आराधना केल्यावरून माझ्या प्रसादानें तुझा जन्म झाला आहे व ह्याच जन्मीं परमात्मप्राप्ति होऊन तूं कृतार्थ होशील ' असें ह्मणून त्यानें त्यांस पोटभर दूध प्यावयास दिलें व त्याच्या मस्तकीं वरदहस्त ठेवला. याप्रमाणें सात दिवस रोज भानुदासास दूध प्यावयास मिळालें. दहाव्या दिवशीं भानुदास देवळाच्या बाहेर आला. बापाला एकदाचा मुलगा भेटला व सर्वांस मोठा आनंद झाला. सूर्यप्रसादाची गोष्ट लवकरच प्रकट होऊन त्याचें पहिलें नांव लोपून त्यास भानुदास ह्मणजे सूर्याचा उपासक असें नवें नांव मिळालें. भानुदासानें पुढें तीन गायत्री पुरश्चरणें केलीं असें सांगतात. ह्या कथेला अनुलक्षून एकनाथांनीं आपल्या भागवतांत (अ० १) पुढील प्रमाणें उद्गार काढले आहेतः—

वंदूं भानुदास आतां । जो कां पितामहाचा पिता ।
ज्याचेनि वंश भगवंता । जाला सर्वथा प्रियकर ॥ १३० ॥

जेणें बाळपणीं आकळिला भानु । स्वयें जाहला चिद्भानु ।
जिंतोनि मानाभिमानु । भगवत्पावनु स्वयें जाला ॥ १३१ ॥

३ असो. यथाकाळ भानुदासाचें लग्न झालें. कांहीं वर्षांनी भानुदासाचे आईबाप निवर्तले व सारा संसार त्याच्या गळ्यांत पडला. पण त्याचें प्रपंचांत लक्ष नसल्यामुळें वः—

न करी कोणाचें उपार्जन । उदीमव्यापार देणें घेणें ।
न करी कदा राजसेवन । पांडुरंगभजन करीतसे ॥

भक्तिविजय अ. ४२–३५.

असा निःस्पृहपणाचा त्याचा वर्तनक्रम असल्यामुळें घरांत अन्न-वस्त्राची टंचाई होऊन बायकापोरांना दारिद्र्याचें हाल काढावे लागले. घरांत मुलेंलेंकरें असोन गृहिणीचें चित्त नेहमीं उदास असे. भानुदासाच्या संसाराची ही तारंबळ पाहून त्याच्या सख्या-सोयऱ्यांनीं त्याला कांहीं भांडवल जमवून दिलें व 'चाटेपणाचा धंदा करून नफ्यावर कुटुंबपोषण करून हळुहळु मुद्दल फेडीत जा असें त्यास सांगितलें. प्रारब्धानुसार जें मिळेल त्यावर गुजारा करा-यचा, पण प्राण गेला तरी खोटें भाषण करावयाचें नाहीं अशी त्यानें उघड प्रतिज्ञा केली. कापड घ्यायला कोणी गिऱ्हाईक दुकानांत आलें कीं 'ही मूळ खरेदी व हा मुदलावरचा नफा' यांत कांहीं कमी होणार नाहीं, चित्तास येईल तर ही किंमत द्या, नाहीं तर रस्ता सुधरा' असा यानें रोकडा एक–जबाब द्यावा; व विठ्ठल-भजनाचा आपला सपाटा लावावा ! घरींदारीं त्याचा नामस्मरणाचा

छंद व व्यापारांतला सरळपणा पाहून इतर व्यापाऱ्यांनीं 'याच्या कपाळीं भीकच लिहिली आहे' म्हणून याचा उपहास करावा! लबाडी केल्याशिवाय धंदा चालत नाहीं, असें लबाडी अंगवळणी पडलेल्या लोकांना वाटत असतें. तरुण मनुष्य धंद्यांत प्रथम पडला म्हणजे जगाचें वारें लागलें नाहीं तोंपर्यंत तो सचोटीनें वागतो, पण पुढें पुढें समव्यवसायी लोकांची राहणी पाहून व डोळ्यांपुढें पैसा खेळूं लागला कीं लोभाचें मांजर होऊन, तो निगरगट्ट बनतो व एकंदर प्रवाहासारखा होऊन जातो, असा सामान्य नियम आहे; पण भानुदास हे अपवादकोटींतले होते! खरेपणानें चालण्याचा निश्चय करणें व त्याप्रमाणें लोभमोहादिकांना न बधता निःशंकमनानें वागणें याला मोठें धैर्य लागत असतें. असें सात्विक धैर्य भानुदासांत होतें. सत्यव्रताला विलक्षण धैर्य लागत असतें. तें भानुदासाच्या अंगीं होतें. विघ्नांना न जुमानतां त्यांनीं आपलें सत्यव्रत निष्कंपचित्तानें पाळलें. त्यांच्या धंद्यांत त्यांना पहिल्यांदा बूड आली, धंदा नीट चालेना, सावकारांनींही कावकाव चालविली, लोक हेळणा करूं लागले, बरोबरीचे धंदेवाले सत्यनिष्ठेचीच कुचेष्टा करूं लागले व एकंदरीनें भानुदासांना या धंद्यामुळें फार त्रास झाला. सत्यनिष्ठेनें कोणाचें वांकडें होत नाहीं, असत्यानें कोणाचें कल्याण होत नाहीं, व सत्यनिष्ठ पुरुषाच्या आपत्ति फार वेळ टिकतही नाहींत, या नियमानुसार १।४

वर्षानंतर सारें पारडें फिरलें. भानुदास हा मोठा देवभक्त व सच्चा मनुष्य आहे अशी त्यांची कीर्ति स्थिर झाल्यामुळें त्यांच्याच दुकानाकडे सारें गिऱ्हाईक लोटूं लागलें, थोड्याच वर्षांत भानुदासांस अतोनात पैसा मिळून त्यांचें दैन्य फिटलें, व त्यांच्या बायकापोरांची हलाखी जाऊन घरांत लक्ष्मी नांदूं लागली.

४ भानुदासांचा एकंदरींत बस बसला, पण त्यामुळें त्यांचे बरेच धंदेवाले त्यांचा हेवादावा करूं लागले! 'मज आहे तुज साजेना' हा जनस्वभावच आहे. चाटीपणाचा धंदा करणारे लोक आपापल्या घोड्यावरं कापडाचीं दिंडें लादून बाजाराच्या दिवशीं सभोंवारच्या गांवांतूनही कापडविक्रीसाठीं जात असत. एके दिवशीं सगळे चाटी बाजारहाट करून अस्तमानसमयीं धर्मशाळेंत उतरले होते. त्यांत भानुदासही होते. मध्यरात्रीच्या समयास मृदंगाचा ध्वनि ऐकून आसपास कोठें कीर्तन चाललें आहे असें समजून आपल्या दिंडावर व घोड्यावर लक्ष ठेवायला इतर चाट्यांना सांगून भानुदास स्वानंदोल्हासानें कीर्तनास गेले. ते तिकडे भजनानंदांत रंगले असतांना इकडे कांहीं मत्सरी चाट्यांनीं भानुदासांचा घोडा सोडून दिला, व त्यांचे दिंड लांब एका खांचेंत टाकून दिलें व आपण जसें कांहीं त्या गांवचेंच नाहीं अशा बहाण्यानें स्वस्थ येऊन निजले! देवाला त्या खळांचा हा दुष्टावा सहन न होऊन त्यानें या संतद्वेष्ट्या चाट्यांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घाल-

ण्यासाठीं एक माव रचली. रात्रीं दोन वाजण्याच्या सुमारास चोरांची एक टोळी त्या धर्मशाळेवर नेमकी आली व त्या चोरांनीं सर्व चाटयांना यथास्थित चोप देऊन त्यांचीं दिंडें व घोडीं लुटून नेलीं! भानुदास साधुपुरुष असून आपण त्याचा व्यर्थ छळ केल्या-बद्दल आपणांस हें प्रायश्चित्त मिळालें असें मागून कांहीं सौम्यप्रकृति चाटयांना वाटलें व ते भानुदासांच्या आगमनाची वाट पाहत बसले. इकडे कीर्तन आटोपल्यावर भानुदास विठ्ठलनामाचा घोष करीत मंदिरांतून बाहेर पडले तों वाटेंतच एक ब्राह्मण त्यांच्या घोड्याचा लगाम हातांत धरून बसलेला त्यांस आढळला. भानुदास आपला घोडा त्याजपासून घेऊन परत धर्मशाळेंत आले तों झालेला प्रकार त्यांस समजला. कांहींनीं त्यांचें दिंड त्यांस परत आणून दिलें व कृतापराधाची क्षमा मागितली. भानुदासांचा घोडा त्यास मिळाला, दिंड सुरक्षित राहिलें, मार चुकला व कीर्तनसुख भोगावयास सांपडलें, आणि त्यांचा हेवा करणाऱ्यांचीं दिंडें व घोडीं जाऊन त्यांस व्याजांत मार मात्र खावा लागला! ह्या गोष्टीचें चिंतन करीत भानुदास बसले होते तों आपलें रक्षण स्वतः पांडुरंगानें केलें व आपल्या घोड्याचा लगाम ज्यानें हातीं दिला तो ब्राह्मणवेषधारी साक्षात् पांडुरंगच होय असें मनांत येऊन भानुदास प्रेमानें गहिंवरले. दामाजीसाठीं विठ्या महाराचें सोंग घेणाऱ्या पांडुरंगानें भानुदासासाठीं एक प्रहर मोतद्दारी केली हें त्या भक्तवत्सल प्रभूच्या ब्रीदाला

योग्यच झालें; तथापि ज्यामुळें इतरांना हेवा वाटला व देवाला भार झाला तो धंदाच यापुढें सोडून देण्याचा भानुदासांनीं निर्धार केला व आपलें कापड इतर चाटयांस वांटून आपण मोकळे झाले!

५ भानुदासांनीं यानंतर धंद्यांतून आपलें अंगच काढलें. मानाभिमान सोडून त्यांनीं अहर्निश हरिगुणाचा छंद घेतला व तदनुरूप आपला वर्तनक्रम रेखून टाकला. भानुदासांची राहणी महिपतबावांच्याच प्रेमळ शब्दांनीं सांगतों:—

नकरी कोणाचें उपार्जन । प्रपंचचिंतेंत न घाली मन ।
कुटुंब कलत्र असोन । उदासपणें वर्ततसे ॥ १२५ ॥
आषाढीकार्तिकी येतां बरी । चालवी पंढरीची वारी ।
टाळमृदंगघोषगजरीं । कीर्तन करी वाळुवंटीं ॥ १२६ ॥
नानापरीची कवित्वकळा । रचूनि आळवी घनसांवळा ।
हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा । कीर्तनीं गळा सद्गदित ॥ १२७ ॥
दुर्बुद्धि अथवा अज्ञान खळ । तेही ऐकूनि होती प्रेमळ।
म्हणती यया मुखींचें कीर्तन प्रांजळ । सार्वकाळ ऐकावें ॥ १२९ ॥
अयाचितवृत्तिकरून । कोणी देईल वस्त्रअन्न ।
परी स्वमुखेंकरूनि जाण । नाहीं मागणें कोणासी ॥ १३१ ॥
आपलें आणि परावें । हे कल्पनाचि नाहीं स्वभावें ।
सर्वांभूतीं ऐक्यभावें । विकल्प वाव टाकिला ॥ १३२ ॥

—भक्तिविजय अ. ४२

कोणाचें उपार्जन म्हणजे आर्जव न करणें, प्रपंचचिंता न वाहतां अखंड हरिचिंतन करणें, आषाढी–कार्तिकीला नेमानें पंढरीस जाऊन वाळवंटावर 'प्रेमाच्या जिव्हाळ्यानें' कीर्तन करणें–याप्रमाणें भानुदासांनीं आपला आयुष्यक्रम ठेविला व या क्रमानें जातां जातां त्यांचा आपपरभाव पार मावळून जाऊन सर्वाभूतीं ऐक्यभाव उत्पन्न झाला. भानुदास परम भक्त झाले. ह्या भक्तपणाचा सुखसोहळा भोगीत असतांना भानुदास महाराजांच्या मुखांतून अनेक प्रेमळ अभंग निघाले. हे अभंग म्हणजे त्यांच्या शुद्धप्रेमाचा केवळ आरसाच होत. आज त्यांचे १०० अभंग उपलब्ध आहेत. त्यांचा थोडा प्रकार आपण पाहूं या:–

१

इहीं श्रवणीं तुझे गुणनाम ऐकेन ।
इहीं चरणीं तीर्थपंथें चालेन ॥
नाशिवंत देह कवणिये काजा ॥
ऐसी प्रेमभक्ति देईं सहजा ॥ १ ॥
अखंड तुझें नाम उच्चारी ।
तेणें संसारा होय उजरी ॥ ध्रु० ॥
उदरव्यथेलागीं मी न करी धंदा ।
उच्छिष्टप्रसादें हरावी हे क्षुधा ॥
आपुली स्तुति आणि पराविया निंदा ।
हे दोन्ही आतळों नेदीं गोविंदा ॥ २ ॥

सर्वाभूतीं रामा ! तूंतेंचि देखे ।
तुझेनि प्रसादें सदा संतोखे ॥
देवा भानुदास मागे इतुकें ।
चाड नाहीं आम्हां वैकुंठलोकीं ॥ ३ ॥

२

बैसोनी अनुष्ठान रामनामध्यान ।
यापरी साधन नेणे कांहीं ॥ १ ॥
एकविधभाव दृढता हें मन ।
यापरी साधन आन नाहीं ॥ २ ॥
परद्रव्य-परदारेचा विटाळ ।
यावीण निर्मळ तप नाहीं ॥ ३ ॥
भानुदास म्हणे रामनामगुढी ।
लाविली चोखडी कलियुगीं ॥ ४ ॥

३

उन्मनी समाधी नाठवे मनासी ।
पाहतां विठोबासी सुख बहु ॥ १ ॥
आनंदीआनंद होय परमानंद ।
आनंदाचा कंद विठोबा दिसे ॥ २ ॥
जागृती स्वप्न सुषुप्ती नाठवे ।
पाहतां सांठवे रूप मनीं ॥ ३ ॥

भानुदास म्हणे विश्रांतीचें स्थान ।
विठ्ठल निधान सांपडलें ॥ ४ ॥

४

भाकितों करुणा पंढरीच्या राया । अगा यादवराया रामकृष्णा ॥ १ ॥
तूं माय माउली जीवीं जीवनकळा । भक्ताचा ळळा पुरविसी ॥ २ ॥
आवडे सावडे भक्ताचें कीर्तन । नाचसी येऊन निराभिमानें ॥ ३ ॥
**भानुदास** ह्मणे पुरवी माझे ळळे । विठ्ठलें सांवळे माउलिये ॥ ४ ॥

५

अनादि परब्रह्म जें कां निजधाम ।
ते ही मूर्ति मेघश्याम विटेवरी ॥ १ ॥
जयातें पाहतां श्रुति परतल्या 'नेति नेति' ।
ते हे परब्रह्ममूर्ति विटेवरी ॥ २ ॥
वेदां मौन्य पडे श्रुतींशीं सांकडें !
वर्णितां कुवाडें पुराणांशीं ॥ ३ ॥
ज्ञानियांचें ज्ञान मुनिजनांचें ध्यान ।
तें परब्रह्म निधान विटेवरीं ॥ ४ ॥
पुंडलीकाचें तपें जोडलासे ठेवा ।
**भानुदास** देवा सेवा मागे ॥ ५ ॥

६

आलों दृढ धरूनि जीवीं । तो गोसावी भेटला ॥ १ ॥

जन्म मरण हरला पांग । तुटला लाग प्रपंचा ॥ २ ॥
इच्छा केली तें पावलों । धन्य जालों कृतकृत्य ॥ ३ ॥
**भानुदास** ह्मणे देवा । द्यावी सेवा जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

६ असो ह्या एवढ्या अभंगावरूनही भानुदासांची चांगली ओळख होणारी आहे. ते परम प्रेमळ भक्त होते. सत्यनिष्ठा, आत्मस्तुतिपरनिंदेचा त्याग, परद्रव्यपरदारेचा विटाळ, एकविधभाव, नामसंकीर्तनप्रीति, व परमात्मप्राप्तीचा आनंद हे यांचे गुण यावरून प्रतीत होतात.

'व्रत करी एकादशी । नेमें जाई पंढरीसी ।
आषाढी आणि कार्तिकीसी । दोही वारीसी चुकों नको' ।

असा त्यांचा उपदेश आहे. पंढरीला जाऊन 'लावण्यरूपडें पहा डोळे भरी । मूर्ति हे गोजिरी विटेवरी ॥' असें हे कळवळ्यानें सांगतात. 'काया वाचा आणि मन । लोभलें सगुणरूप पाहतां' असा त्यांचा अनुभवच होता. 'नामाचा उच्चार संतांचा सांगात । पुरवावा हेत जन्मोजन्मीं ।' हें दान त्यांनीं देवापाशीं मागितलें आहे. पंढरीनाथांनीं भानुदासांना स्वस्वरूपीं ठाव दिला. भानुदास धन्य झाले. ह्या महाभागवताला माझें सहस्र प्रणाम असोत.

७ भानुदास हे महाभागवत होतेच, पण त्यांनीं महाराष्ट्रमंडळाची दुसरीही एक मोठी कामगिरी केली आहे. भानुदासांनीं विठ्ठलाची

मूर्ति अनागोंदीहून परत आणल्यामुळें त्यांची कीर्ति सर्वतोमुख झाली. तो प्रसंग येणेप्रमाणें:—भानुदासांच्या वेळीं तुंगभद्रातटाकीं विजयानगर उर्फ अनागोंदी येथें कृष्णराय नांवाचा बलाढ्य राजा राज्य करीत होता. विजयानगरच्या सर्व राज्यांत याच्यासारखा पराक्रमी, करारी, तेजस्वी, विद्यावंत व धर्मनिष्ठ राजा दुसरा झाला नाहीं. यानें बावीस वर्षे ( शके १४३०–१४५२ ) राज्य केलें. यानें पूर्व, पश्चिम व दक्षिण ह्या दिशांस आपल्या राज्याच्या सीमा समुद्रापर्यंत नेऊन भिडविल्या. याला शत्रु म्हणून कोणी राहिला नाहीं. यानें विजापूरच्या इस्मायल अहिलशहाचा पराभव करून रामेश्वरापासून बेळगावापर्यंत आपला अंमल बसविला. यानें अनेक राजे पादाक्रांत केले, किल्ले बांधले, जमीनीची मोजणी करून वसुलाची पद्धत कायम केली, कालवे बांधले. व्यापार, शेतकी, कलाकौशल्य व विद्या यांना उत्तेजन दिलें व हिंदुधर्माचा लौकिक वाढविला. तुंगभद्रेचा जगविख्यात कालवा यानेंच बांधला. हुबळी, बंगलूर, बळारी हीं व्यापाराचीं ठिकाणें यानेंच वसविलीं. याच्या आश्रयाला आठ विद्वद्रत्नें होतीं. त्यांना ‘ दिग्गज ’ ही संज्ञा होती. त्यापैकींच सुप्रसिद्ध आप्पया दीक्षित हे एक होत. तेन्नलु रामकृष्ण नामक अत्यंत विनोदी व चतुर कवि याचा मित्र होता. या कवीच्या चातुर्याच्या अनेक गोष्टी तेलगु भाषेंत प्रसिद्ध आहेत. याचें आपल्या प्रजेवर व प्रजेचें यावर फार प्रेम होतें. यानें अनेक सुंदर

देवालयें बांधलीं व त्यांच्या खर्चास जमीनी लावून दिल्या. याचें विस्तृत चरित्र येथें देतां येत नाहीं याबद्दल फार वाईट वाटत.

८ कृष्णरायाचा व भानुदासांचा थोडा संबंध येतो. हा राजा सहज पंढरीस देवदर्शनास गेला असतांना तेथल्या वारकऱ्यांचा प्रेमळ कीर्तनसोहळा पाहून फार आनंदित झाला. त्याला ती विठ्ठलमूर्ति आपल्या राजधानीस नेण्याची बुद्धि झाली, व तो समर्थ असल्यामुळें त्यानें स्थळोस्थळीं डांक ठेवून सोंवळ्यानें विठोबास अनागोंदीस नेले. तेथें देवास अनेक भोगोपचार देऊन स्वर्णरत्नांचे अलंकार व नवरत्नांचे हार यानें मोठ्या भक्तीनें अर्पण केले. देवास मात्र त्यानें कडेकोट बंदोबस्तांत ठेवलें व त्याची पूजाअर्चा चालू केली. इकडे आषाढीला चहुंकडे वारकरी पंढरीस आले तेव्हां देव देवळांत नाहीं हें पाहून ते फार उदास झाले. कांहीं एकनिष्ठ भक्त तर देवदर्शन होईपर्यंत येथून हालायचें नाहीं अशा निग्रहानें तेथें गरुडपारींच पडून राहिले ! राजावांचून सेना किंवा मंगळसूत्रावांचून गळा, तसा तो भक्तसमुदाय विठ्ठलावांचून उदास झाला. आपण आजवर ज्या पायावर आपलीं शिरें सुमनासारखीं प्रेमानें वाहिलीं, विटेवर उभें असलेलें जें सुंदर ध्यान ‘ सर्व सुखाचें आगर ’ म्हणून डोळां भरून पाहिलें, ज्याच्या दर्शनमात्रें करून लक्षावधि जीवांना ब्रह्मत्व प्राप्त झालें, जें नामदेवादिभक्तांनीं प्रत्यक्ष बोलतें केलें, तें कटीवरी कर ठेवून प्रेमळ भक्तांना भक्तिसुखामृत पाजणारें विठ्ठलाचें सगुण

रूपच डोळ्यांनीं पहावें व स्वसुखामृत अखंड चाखावें अशी ज्यांना परम आर्त, असे जे निस्सीम भक्त पंढरीस राहिले होते त्यांत भानुदास हे अग्रेसर होते. अनागोंदीहून विठोबाला मीं परत आणतों, तुम्ही निश्चितपणें नामघोष करीत येथेंच रहा असें सांगून ते अनागोंदीस गेले. तेथें गेल्यावर तुंगभद्रेचें स्नान करून व ब्रह्मकर्म सारून ते देवाच्या शोधार्थ निघाले. आपल्या सदाचरणानें, भक्तीनें व ब्रह्मानुभवानें भानुदास पांडुरंगास प्रिय झालेच होते, त्यामुळें मध्यरात्रीच्या सुमारास ते राजवाड्याजवळ गेले तेव्हां कुलपें अपाप गळून पडलीं व क्षण न लागतां भानुदास देवासमोर जाऊन उभे राहिले! भानुदास देहभाव विसरले व त्यांनीं देवाच्या पायीं मिठी घातली. प्रेमाश्रूंनीं ते पाय न्हाणल्यावर ते देवास म्हणाले:——

## अभंग

भक्त भागवत सकळ पारुषले । निःशब्द ते ठेले तुजवीण ॥ १ ॥
रखुमाई आई ते जालीसे उदास । कैसे पुंडलिकास मौन पडलें ॥ २ ॥
भानुदास म्हणे चाल आम्हांसवें । वाचाऋण देवें आठवावें ॥ ३ ॥

भानुदासांनीं दगडाचेंही पाणी होईल इतक्या कळवळ्यानें देवाला आळवलें तों देवानें:—

आवडीच्या सौरसीं । निजकंठीच्या माळेसी ।
प्रसाद भानुदासासी । घालूनि गळ्यासी बोळविले ॥

केशवकृत नाथचरित्र अ. १४.

देवाच्या गळ्यांतला नवरत्नहार माळेबरोबर भानुदासांच्या हातांत आला. हा महाप्रसाद मानून भानुदास वाड्याबाहेर पडले तेव्हां अर्गळा पूर्वीसारख्या लागल्या. पांहटेस पूजारी कांकडआरतीला आले तेव्हां देवाच्या गळ्यांतला नवरत्नहार त्यांस दिसला नाहीं. त्यांनीं घाबरून राजास कळविलें. कडच्याकुलपें व पाहरे ओलांडून कोण धाडसी चोर वाडयांत शिरला आहे. याचें सर्व आश्चर्य करूं लागले. राजसेवकांनीं गांवभर चौकशी चालविली, तों त्यास तुंगभद्रातीरावर निःशंकपणें गात नाचत विठ्ठलरूपीं समरस झालेले भानुदास आढळले, व त्यापाशीं देवाच्या गळ्यांतील पुष्पहारासह नवरत्नहारही सांपडला. राजा क्रोधाविष्ट झाला व त्यानें चोराला सुळावर चढवण्याचा हुकूम केला. सुळापाशीं नेतांच भानुदास शांतपणानें म्हणाले:—

अभंग.

आकाश कडकडोनियां पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये ॥
वडवानळ त्रिभुवन खाये । तैं मी तुझीच वास पाहे विठोबा ॥१॥
सप्तही सागर समरस होती । तैं हे विरोनि जाय क्षिती ।
पंच महाभूतें प्रयळ पावतीं । तैं तूंचि सांगाती विठोबा ॥२॥
भलतैसें पडो जडभारी । परी मी नाम न सांडी निर्धारी ।
पतिव्रता जैंवि प्राणेश्वरी । **भानुदास** म्हणे निर्धारी गा विठोबा ॥३॥

एवढा प्रचंड निर्धार व हा अलौकिक एकविधभाव ज्या भागवताचा झाला त्याची प्ऱ्हादप्रिय पांडुरंग उपेक्षा करील काय ? असें

कोणतें संकट आहे कीं, ज्यांतून देव भक्ताला सांभाळणार नाहीं? देवानें आजवर कोणा भक्ताची उपेक्षा केली आहे? या भक्ताला ताप झाल्यावर 'माउलीहुनि मवाळ, चंद्राहुनि शीतळ व पाणियाहूनि पातळ' म्ह० प्रेमाचा केवळ कल्लोळ असा भक्तवत्सल पांडुरंग तात्काळ उचंबळला व सुळाला पल्लव फुटलें व निमिषार्धांत तो सूळ पुष्पफळांनीं डवरून येऊन त्या सुळाचा सुंदर वृक्ष झाला!! हरीची लीला अगाध आहे. राजसेवक हा चमत्कार पाहून राजाकडे धांवतच गेले व राजास हा चमत्कार सांगते झाले. तो ऐकून राजा मनीं दचकला व सुळावर द्यावयास काढलेला चोर खरा चोर नसून कोणी महाभक्त आहे हें त्यानें ओळखलें. भानुदासास त्यानें पालखींत घालून वाड्यांत नेलें. विठ्ठलदर्शन होतांच भानुदासाचें चित्त चाकाटलें, त्याला आपादकंचुकित रोमांच आले व डोळ्यांतून आनंदजळाचा वर्षाव झाला! राजा भानुदासांची अपूर्व भक्ति पाहून परम संतोषला व विठ्ठलमूर्ति पंढरीस नेण्याची त्यानें भानुदासास परवानगी दिली. अनंतघटीं व्यापून राहणारा थोर देव भक्तासाठीं सान झाला व विठोबाची ती सांवळी मनोहर मूर्ति सांवळींत घालून भानुदास निघाले. भानुदास देवाला घेऊन आले हें कळतांच पंढरीचे व आसपासचे हजारो भाविक वैष्णववीर दिंड्या पताका घेऊन टाळमृदंगाचा गजर करीत त्यांस सामोरे आले! पंढरीस

---

१ ही कथा नामदेवकृत एका ५४ चरणी अभंगांतही दिली आहे. हा नामदेव १३ व्या शतकांतला प्रसिद्ध नामदेव नव्हे.

चार दिवस आनंदीआनंद दुमदुमून राहिला. देवाला रथावर घालून मिरविले. तो दिवस कार्तिकी एकादशीचा होता. कार्तिकीला अद्यापपर्यंत देवाच्या रथाची मिरवणूक निघत असते. ती भानुदासांनीं अनागोंदीहून विठोबास परत आणलेल्या मंगल दिवसाचें पवित्र स्मारक होय !

९ पंढरीस भक्तमंडळींनीं भानुदासांचा जयजयकार केला. विठोबा आणून भेटवल्याबद्दल व पंढरीचा सांप्रदाय मोडण्याचा समय आला होता, तो आपल्या भक्तिबळानें टाळल्याबद्दल त्यांचे धन्यवाद गाइले. 'कोरडिया काष्टीं अंकुर फुटले। येथें येणें झालें विठोबाचें' ह्या अभंगावर गरुडपाराजवळ भानुदासांचें कीर्तन झालें. भानुदासांचे भक्तमंडळावर अनंत उपकार झाले आहेत. भानुदासांचें भक्तिऋण देवानेंही त्यांच्या कुळांत श्रीएकनाथासारखा जगविख्यात भक्तशिरोमणि निर्माण करून फेडलें असें मला वाटतें! यापुढें भानुदासांच्या ठिकाणीं भक्तिपरिपाक उत्तम झाला. पैठणास एके रात्रीं भानुदास वीणा हातीं घेऊन प्रेमानें देवास आळवीत असतां साक्षात् श्रीपांडुरंग प्रकट झाले. धन्य भानुदास! धन्य एकनाथ! व धन्य त्यांचें कुळ! भानुदासांचा पुत्र चक्रपाणी, चक्रपाणीचा सूर्यनारायण, व सूर्यनारायणाचा पुत्र एकनाथ. नाथांच्या आईचें नांव रुक्मिणि. भानुदासांच्या पवित्र वंशांत जन्म मिळाल्याबद्दल नाथांना नेहमीं धन्यता वाटे.

१० नाथांचे भानुदासांबद्दल उद्गारः—

मी जन्मलों धन्यवंशीं । म्हणोनि हरिभक्ति आम्हांसी ॥
संत सोइरे निजसुखासी । वंश कृष्णासी निरविला ॥१६५॥

रुक्मिणी स्वयंवर प्रसंग १६.

पूर्वीं भानुकृपासौरस । पितामहपिता भानुदास ॥
त्यापासोनि हा वंश । जनार्दनप्रिय ॥ ४३८ ॥

श्रीशुकाष्टक टीका.

नाथांनीं आपल्या भागवताच्या उपोद्धातांत मोठ्या पूज्यभावानें म्हटलें आहे.

वंदू भानुदास आतां । जो कां पितामहाचा पिता ।
ज्याचेनि वंश भगवंता । जाला सर्वथा प्रियकर ॥ १३० ॥
जेणें बाळपणीं आकळिला भानु । स्वयें जाहला चिद्भानु ।
जिंतोनि मानाभिमानु । भगवत्पावनु स्वयें जाला ॥ १३१ ॥
जयाची पदबंधप्राप्ती । पाहों आली श्रीविठ्ठलमूर्ति ।
कानीं कुंडलें जगज्योती । करितां रातीं देखिला ॥ १३२ ॥
तया भानुदासाचा चक्रपाणी । तयाचाही सुत सुलक्षणी ।
तया सूर्य नाम ठेवूनी । निजीं निज होऊनि भानुदास ठेला १३३
तया सूर्यप्रभाप्रतापकिरणीं । मातें प्रसविली रुक्मिणी ।
म्हणोनि रखुमाई जननी । आम्हांलागुनी साचची ॥ १३४ ॥
हे ग्रंथारंभकाळा । वंदिली पूर्वजमाळा ।
धन्य निजभाग्याची लीळा । आलों वैष्णवकुळा जन्मोनी ॥ १३५

वरील उद्गारांवरून नाथांची भानुदासाविषयीं केवढी पूज्यबुद्धि होती हें दिसतें. भानुदासामुळें आपला वंश हरीला प्रिय झाला व अशा वैष्णवांच्या पवित्र कुळांत मला माझ्या भाग्यानें जन्म मिळाला या संबंधानें नाथांचे प्रेमळ उद्गार हृदय हालविणारे आहेत. मी भानुदासांच्या शुद्धकुळांत जन्मलों म्हणून हरिभक्तीचा मला छंद लागला असें नाथ सात्विक अभिमानानें सांगतात. 'धन्य निजभाग्याची लीळा । आलों वैष्णवकुळा जन्मोनी' ह्या धन्योद्गाराचें मर्म अनुभवियानांच कळणार आहे! भानुदासांची सत्यनिष्ठा, त्यांची एकविधभक्ति व त्यांचें शुद्धाचरण या गुणांचा विचार केला म्हणजे 'शुची व दैवगुणांनीं श्रीमंत' अशा, पवित्र घराण्यांत एकनाथासारखा योगभ्रष्ट महात्मा जन्माला आला, हें स्वाभाविकच आहे असें मनांत येऊन शुद्ध कुलपरंपरारक्षणाचें फारच महत्व वाटतें. वरील १३३ व्या ओवीवरून नाथांचे जनक सूर्यनारायण यांचा जन्म होतांच भानुदासांनीं देह ठेवला असें स्पष्ट दिसतें. ही गोष्ट शके १४३५ च्या सुमारास झाली असावी.



## २ नाथांचें बाळपण.

मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पहांट फुटे ।
सूर्यापुढें प्रगटे । प्रकाश जैसा ॥ ४५२ ॥
तैसी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां ।
बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ४५३ ॥

—ज्ञानेश्वरी अ० ६

१ एकनाथांचा जन्म. २ संत घराण्यांतल्या नावांचें मर्म. ३ बाळपणचे गुण. ४ प्रज्ञाबळ व श्रद्धाबळ.

१ भानुदासांनीं आपल्या मुलाचें नांव 'चक्रपाणी' व नातवाचें नांव 'सूर्यनारायण' ठेवलें. सूर्यनारायणाच्या बाळपणींच भानुदास[1] निजधामास गेले. त्यानंतर २० वर्षांनींच—शके १४५० च्या सुमारास—सूर्यनारायणापासून रुक्मिणीच्या पोटीं 'एकनाथ' जन्मले. एकनाथांच्या जन्मकाळीं मूळनक्षत्र होतें. त्यामुळें जन्मतः बाप व थोडक्याच वेळानें आई मरण पावली! भानुदासाच्या सोज्वळ वंशांत हा एकच मुलगा राहिला म्हणून चक्रपाणीनें याचें नांव 'एकनाथ' ठेवलें. आजा व आजी, यांस लहानपणीं प्रेमानें 'एक्या' म्हणत! मायबापांचा जन्मतःच ग्रास करून उर्वरित

---

१. तेराव्या शतकांत नामदेवाशीं समकालीन असलेल्या भानुदासाहून हे भानुदास निराळे आहेत. त्या भानुदासाचें चरित्र चिद्घनस्वामीकृत भक्तिसारामृत अ. १३ मध्यें दिलें आहे.

राहिलेल्या एकनाथांच्या नांवाचा जो अध्यात्मदृष्टचा सुंदर बोध होतो तो नाथांच्याच पुढील अभंगांत व्यक्त झाला आहेः—

मुळीच्या मुळीं एका जन्मला ।
मायबापें थोर धाक घेतला ॥ १ ॥
कैसें मूळ नक्षत्र आलें कपाळा ।
स्वयें लागलों दोहींच्या निर्मूळा ॥ २ ॥
शांती करतां अवघ्यांची जाली शांती ।
मुळीं लागोनीयां लाविली ख्याती ॥ ३ ॥
**एका जनार्दनीं** मुळींच्या गोठी ।
मायसगट सगळा बापचि घोंटी ॥ ४ ॥

हा अभंग कोठेंही छापलेला नाहीं, तथापि पैठणास कांहीं जुन्या पोथ्या चाळीत असतांना मला आढळला. तो मौजेचा आहे, असें वाटल्यावरून येथें देत आहे. एकनाथाचा जन्म होतांचे मायबापांनीं धाक घेतला, शांति केली, तथापि दोहींचें निर्मूळ झालें ! एकनाथानें मात्र मुळीं लागून म्हणजे शुद्ध आत्मस्वरूपाकार होऊन ख्याती केली ! हा सरळ कथापर अर्थ झाला, तथापि ह्या अभंगांत दुसऱ्याही एका अर्थाचा ध्वनि आहे. माय प्रकृति व बाप पुरुष अथवा माय क्षर व बाप अक्षर ह्या दोघांनाही गिळून जो उर्वरित राहतो तो क्षराक्षरातीत परमात्मा हाच 'एकनाथ' होय!

२ असो. एकनाथांनीं आपल्या जनकास म्हणजे सूर्यनारायणास 'सुलक्षणी' असें विशेषण लावून 'सूर्यप्रभाप्रतापकिरणीं। मातें प्रसवली रुक्मिणी' असें म्हटलें आहे. सूर्यनारायण हे फार बुद्धिवान् होते व रुक्मिणी आई ह्या मोठ्या पतिव्रता व सुशील होत्या. हे आईबाप मुलाचें बालपणचे लाड करण्यासही जगले नाहींत व नाथांचा सांभाळ करण्याचा सर्व भार 'चक्रपाणी'वर पडला. भानुदास, त्यांचा पुत्र चक्रपाणि, चक्रपाणीचा सूर्यनारायण व सूर्यनारायणाचे पुत्र एकनाथ, हीं सव नावेंही मोहक आहेत. नांवांत काय आहे असें म्हणणें योग्य नाहीं. मुलाबाळांचीं नावें ठेवण्यांत सुद्धां तीं ठेवणाऱ्यांचा स्वभाव दिसून येतो. भानुदासांनीं आपल्या मुलाचें नांव 'चक्रपाणि' व नातवाचें नांव 'सूर्यनारायण' ठेवलें यांत सुद्धां त्यांच्या हरिप्रेमाची जात दिसून येते. मुलाला दगडधोंड्यांचीं नांवें ठेवणारे दगडधोंडे जगांत पुष्कळ आहेत ! 'सुलोचना' 'मनोहर' इत्यादि शरीरसौंदर्यदर्शक नांवें ठेवणारे रसिक आईबापही पुष्कळ सांपडतील; पण धर्मशील घराण्यांतून आपल्या उपास्यदेवतेचीं, तीर्थांचीं, संतांचीं, साध्वींचीं किंवा कोणातरी देवदेवतांचीं नांवें ठेवण्याची चाल आहे. हें हाडामांसाचें स्थूल शरीर निंद्यच आहे. आचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें:—

त्वङ्मांसरुधिरस्नायुमेदोमज्जास्थिसंकुलम् ।
पूर्णं मूत्रपुरीषाभ्यां स्थूलं निंद्यमिदंवपुः ॥ ८९ ॥

— विवेकचूडामणी.

त्वचा, मांस, रुधिर, स्नायु, मेद, मज्जा व अस्थि यांचें उभारलेलें व विष्ठामूत्रांनीं भरलेलें हें शरीर अमंगलच आहे, तथापि या अमंगल शरीराचा आश्रय करूनच 'मंगलांचा मंगल' जो परमात्मा त्याची प्राप्ति व्हावयाची असते. देह असा अमंगल व नश्वर असला तरी ओळखीसाठीं याला कांहीं तरी नांव द्यावें लागतें. देहाला कांहीं तरी नांवच जर द्यायचें आहे तर मग असें नांव द्यावें कीं, जेणेंकरून भगवंताचें तरी पदोपदीं स्मरण होईल ! हा सर्व संसार हरिरूप आहे अशी अखंड भावना रहावी म्हणून भक्तजन संसारांतही पावलोपावलीं हरीचें स्मरण होईल अशीच योजना करीत असतात, त्यांतलाच हा एक प्रकार आहे. भक्तांचीं प्रपंचांतलीं नामेंही हरिस्मरण करविणारीं असतात. 'आंत हरि बाहेर हरि। हरिनें घरीं कोंडिलें' याप्रमाणें हरिमय राहून ते संसारच ब्रह्मरूप करीतात. नामोच्चाराबरोबर नामातीताचें स्मरण व्हावें हा हेतु त्यांच्या नामकरणाच्या मूळाशीं असतो. भागवताच्या ६ व्या स्कंधांत अजामिळाची कथा दिली आहे. अजामीळ महापापी खरा, पण त्यानें आपल्या लाडक्या मुलाचें व 'नारायण' ठेवल्यामुळेंच:—

उष्णांत नारायण खेळताहे। गृहींच नारायण कां न राहे ॥
नाराणा शीतळ पादपाणी। नारायणीं रंगलि विप्रवाणी ॥

—वामनपंडित.

असा त्याला 'नारायण' नामाचा छंद लागल्यामुळें प्राणप्रयाण-समयीं विष्णुदूत त्याला वैकुंठीं नेण्याकरितां आले. पवित्र नामा-बरोबर पवित्र व्यक्तींचें स्मरण होऊन त्यांचें चरित्र डोळ्यांपुढें उभें राहतें व त्यांतच आपल्या उद्धाराचा मार्ग सांपडतो. वाचेला पवित्र-नांवाचे सात्विक संस्कार होऊन अनायासें त्याचा सहस्रशः उच्चार होत असतो. असो. भक्तरक्षणासाठीं व दुष्टविनाशासाठीं भग-वंतांनीं आपल्या हातीं चक्र घेतलें आहे ह्याचें नित्य स्मरण असावें म्हणून भानुदासांनीं आपल्या मुलाचें नांव 'चक्रपाणी' ठेवलें. ज्या सूर्यानें ब्राह्मणवेषानें बाळपणीं आपल्यावर अनुग्रह केला त्याचें नित्य स्मरण व्हावें म्हणून त्यांनीं आपल्या नातवाचें नांव 'सूर्य-नारयण' ठेवलें. हीच परंपरा पुढें चालली. 'एकनाथ' खरोखरचि एकनाथ झाले! एकनाथांनीं आपल्या मुलाचें नांव 'हरि' ठेवलें व दोघीं मुलींचीं नांवें 'गंगा' व 'गोदा' अशीं ठेवून आपल्या काशीवासाचें व नित्य सहवासास असलेल्या गोदेचें स्मरण जागृत ठेवलें. गोदेचें लाडकें नांव त्यांनीं 'लीला' असें ठेवलें, तेंही भगवन्मायेच्या स्मरणार्थच ठेवलें. पुरुषोत्तम जो 'एकनाथ' त्याच्या घरीं याप्रमाणें 'हरि' व 'लीला' बहिणभावंडें होऊन नांदूं लागलीं! लीलेच्या मुलाचें नांवही नाथांनीं 'मुक्तेश्वर' असेंच ठेवलें! नाथांच्या स्त्रीचें नांव 'गिरिजा' होतें. असो. भानुदासांच्या घराण्यांतलीं हीं नांवें सुद्धां त्यांच्या घरीं नांदत असलेल्या भगवद्भ-

र्तीचेंच स्मरण करविणारीं आहेत, म्हणून ह्या गोष्टीचा येथें थोडासा विस्तार केला आहे.

३ एकनाथ अगदीं बाळपणापासून फार बुद्धिवंत व श्रद्धावंत होते. श्रद्धा व मेधा या त्यांच्या देहीं त्यांच्या जन्माबरोबर जन्मल्या होत्या, किंबहुना नाथांनीं त्यांचा स्नेह पूर्वजन्मींच संपादन केला होता! नाथांस स्नानसंध्येची, हरिभजनाची, पुराणश्रवणाची व देवपूजेची भारी आवड होती. त्यांनीं एकांतांत हातीं टाळ किंवा खांद्यावर पळीचा ब्रह्मवीणा घेऊन भजन करावें, दगड पुढें ठेवून त्यावर फुलें वाहून मुखानें ‘रामकृष्णहरी’ म्हणत नाचावें. कोणी हरिदासपुराणिक आले कीं, त्यांच्या पायीं पडून जसें कांहीं सर्व समजतें इतक्या आदरानें कीर्तन एकाग्रतेनें ऐकत बसावें! कोणी कांहीं गोष्ट सांगितली कीं परिप्रश्नानें ती सांगणाऱ्यास रिझवावें. आजोबा पूजाअर्चा करीत बसले कीं, सदां त्यांच्या भोंवतीं भोंवतीं फिरून त्यांस पूजाकर्मांत साह्य करावें. असें हें त्यांचें सुलक्षण पाहून वृद्ध आजाआजींच्या नेत्रांतून नेहमीं प्रेमाश्रूंचे लोट वहात. त्यानें काडूक घेऊन त्याच्या एका टोंकाला चिंधी बांधून तें खांद्यावर टाकून ही माझी पताका म्हणून प्रेमानें नाचावें, तेव्हां त्यास वृद्धांनीं उचलून घेऊन कुरवाळावें व ‘हा मुलगा भानुदासाचें यश दिगंतीं फांकील’ असें म्हणावें!! शेजाऱ्यापाजाऱ्यांना सुद्धा एक-

नाथांनीं आपल्या गुणांनीं मोहित केलें. बालपणीं सुद्धां बालचेष्टा किंवा हट्ट यांना माहित नव्हते. जें मिळेल त्यांत यांचा संतोष असावा. देवब्राह्मण व संत यांच्याविषयीं सहज प्रेम, सत्याची आवड, आंतबाहेर मोकळेपणा, भजनप्रेमामुळें भूकताहानही विसरणें, सर्वांना प्रिय वाटणें, व नम्रता हे गुण एकनाथांच्या ठिकाणीं बाळपणापासून सहज असत. हे मिळवायला यांना कधी आयास करावे लागले नाहींत. अनेक गुणांचें सहज साहचर्य असल्यामुळें निरभिमानता व शांति हे दान अलौकिक गुणही त्यांच्या अंगी बाल्यापासूनच प्रगट दिसत. ह्यांची मनोहर मूर्ति पाहून व भानुदासांच्या श्रेष्ठ कुळाचा हा एकुलता एक तंतु अवशिष्ट राहिला आहे हें ध्यानीं आणून, पैठणचे लोक ह्यांवर फार प्रेम करीत व त्यांत यांच्या गुणांची भर पडल्यामुळें ह्या बालभागवताचा जयजयकार बाळपणापासूनच होऊं लागला.

४ सहाव्या वर्षीं एकनाथांची मुंज झाली व ब्रह्मकर्माचें त्यांस उत्कृष्ट वळण लागलें. मुंज झाल्याबरोबर वेदाक्षरांशीं त्यांचा परिचय झाला. रोज सायंकाळीं पुराणिकबोवा त्यांच्या घरींच पुराण सांगत व नियमानें संस्कृत भाषेचें अध्ययन त्यांजकडून करवीत, पुराणांतल्या गोष्टी नाथांनीं मोठ्या श्रद्धेनें ऐकाव्या, ऐकलेल्या गोष्टी पुनः आपल्या आजीस सांगाव्या व आजोबास व पुराणिकबोवांस

नानाप्रकारच्या शंका विचारून विचारून पुरेसें करावें. संध्या, वैश्वदेव, रुद्र, पवमान हें त्यांनीं हां हां म्हणतां पाठ केलें. पाठांतरास त्यांस बिलकूल वेळ लागत नसे. बाळपण असून यांनीं त्रिकाल संध्या-वंदनादिविधि बिनचूक करावें, स्तोत्रपाठ म्हणावे, सकाळसंध्या-काळ देवांस व गुरुजनांस नमस्कार करावे, स्नानापूर्वीं पाणीही पिऊं नये, लघवीस पाणी घेतल्याशिवाय जाऊं नये, असा शुचि-र्भूतपणाचा व निरलसपणाचा त्यांचा नित्यक्रम पाहून थोरथोरांनीं तोंडांत बोटें घालावींत! नाथांची बुद्धि फार तीव्र असल्यामुळें जो विषय गुरूनें त्यास समजावून सांगावा तो ऐकतां ऐकतांच इतका समजून जावा कीं, यांस पूर्वींच माहीत असलेला विषय मी पुनः शिकविला कीं काय अशी गुरूची गुरूलाच भ्रांत पडावी. नाथांचा अभ्यास म्हणजे पूर्वाभ्यस्त विषयांची उजळणीच असे! त्यांच्या सत्वगुणी बुद्धींत ज्ञानोदय फार जलद होई. 'सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाशउपजायते' या गीताश्लोकावर ( अ. १४-११ ) टीका करितांना ज्ञानेश्वरमहाराजांनीं म्हटलें आहे:—

जे प्रज्ञा आंतुलीकडे । न समाति बाहेरी वोसंडे । वसंतीं पद्म-खंडें । द्रुती जैसी ॥ २०६ ॥ धाराधरकाळें । महानदी उचंबळे ॥ तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥९१२॥ अगा पुनवेच्या दिवशीं । चंद्र-प्रभा धांवे आकाशीं ॥ ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंघ ॥ २१३ ॥

सत्वगुणाचा उदय झाला कीं, "वसंतऋतूंत कमलें फुलल्यावर त्यांचा परिमळ जसा सर्वत्र पसरतो त्याप्रमाणें बुद्धितेज आंत भरून न मावल्यामुळें बाहेर फाकूं लागतें, किंवा वर्षाकाळीं महानदी पाण्यानें तुडुंब भरून दुथडी उचंबळूं लागते, त्याप्रमाणें बुद्धि ज्या ज्या शास्त्राला स्पर्शेल त्याचा कबजा घेत जाते; अथवा पूर्णिमेच्या दिवशीं चंद्रप्रभा ज्याप्रमाणें आकाश व्यापून टाकतें त्याप्रमाणें सत्वगुणी पुरुषाची वृत्ति सर्व ज्ञान कवळून जाते;" हें ज्ञानेश्वरमहाराजांचें अनुभविक वर्णन एकनाथांच्या संबंधानेंही तसेंच खरें आहे. नाथांच्या बुद्धीची अशी धारणा असल्यामुळें त्यांच्या शंकांचें समाधान करितांना पुराणिकबोवांची घाबरगुंडी उडून जाई व 'या मुलाला मी कसा पुरा पडेन' अशी त्यास भीति वाटे. एखादे वेळीं नाथांची ज्ञाननिष्ठा पाहून हा शिष्य नसून कोणी सर्वज्ञ पुरुष माझ्यासमोर बसला आहे असेंही त्यास वाटे. त्यांचें मार्मिक व हृदयाला उकलविणारे प्रश्न ऐकून 'आम्हीं पोटासाठीं पुराण सांगायला शिकलों पण हा जे प्रश्न विचारतो त्यांचें समाधान करण्याचें सामर्थ्य आमच्यांत नाहीं,' असें पुराणिकबोवांनीं चक्रपाणीजवळ जाऊन सांगावें. याप्रमाणें बारा वर्षांच्या वयांत रामायणभारतांतील व अनेक पुराणांतील रम्य कथा व भागवतांतील ध्रुवप्रल्हादादि बालभागवतांचीं आख्यानें ऐकून नाथांच्या बुद्धीला जें विलक्षण सामार्थ्य प्राप्त झालें तें मोठ्यामोठ्या पंडितांनाही अतर्क्य होतें.

सामान्य लोकांना ही गोष्ट अशक्य वाटण्याचा सभंव आहे; कां कीं, असा मुलगा त्यांच्या पाहण्यांत नसतो; पण नाथांसारख्यांचें सर्वच चरित्र असामान्य कोटींतलें असल्यामुळें त्यांचीं बालपणापासूनचीं सर्वच लक्षणें असामान्य कोटींतलीं असल्यास त्यांत अशक्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. पायाळाच्या डोळ्यांत दिव्यांजन पडतांच त्याला पाताळधनें दिसूं लागतात, त्याप्रमाणें सत्वगुणाधिष्ठित पुरुषाला ज्ञान अनायासें प्राप्त होतें. आचार्यांचें वेदाध्ययन १२ वर्षांच्या वयांत पूर्ण झालें, ज्ञानेश्वरमहाराजांनीं १९ व्या वर्षीं ज्ञानेश्वरीसारखा अनुपम ग्रंथ निर्माण केला, समर्थांना बाळपणींच वसिष्ठासारखें कडकडीत वैराग्य प्राप्त झालें, त्यांतलाच नाथांचाही हा प्रकार आहे. ते अनेकजन्मसंसिद्ध होते. लौकिक गुरुपासून मिळण्यासारखी लौकिक विद्या पूर्वजन्माभ्यासबळानें ते सहज संपादून बसले. पण तव्हढ्यानें त्यांची समाधानी होईना. प्रल्हादध्रुवांला जसे नारद भेटले तसें देवाची प्राप्ति करून देणारे सद्गुरु मला कधी भेटतील अशी त्यास तळमळ लागली! अन्य व्यवहारही गोड लागेना. शिष्याची भूमिका तयार झाल्याबरोबर सद्गुरु कांहीं लांब नाहींत, परिपक्व फळाला टोंच मारायला शुक जसे तयार असतात, त्याप्रमाणें अनुग्रहपात्र असा सच्छिष्य तयार होतांच सद्गुरु त्यावर कृपा करण्यासही तयार असतात. एके रात्रीं प्रहररात्र उलटून गेल्यावर नाथ शिवालयांत एकटेच हरिगुण गात

उदासीनपणानें बसले असतां त्यांनीं तेथें आकाशवाणी ऐकली कीं, ‘ देवगडावर जनार्दनपंत नामक सत्पुरुष आहेत त्यांकडे जा, ते तुला कृतार्थ करितील ! ’ ही आकाशवाणी कांनीं पडतांच घरादाराची किंवा आजाआजींची आठवणही न होता नाथ विठ्ठलाचें नांव घेऊन बाहेर पडले ते तिसरे दिवशीं सकाळीं देवगडावर जाऊन पोंहचले, व सद्गदीत अंतःकरणानें त्यांनीं जनार्जनपंतांचें दर्शन करून गुरुचरणीं देह अर्पण केला. ही गोष्ट शके १४६२ च्या सुमारास झाली. गुरुशिष्यभेटीचा तो दिवस धन्य होय.



# ३ नाथांचे गुरु जनार्दनस्वामी.

गुरु माता गुरु पिता । गुरु आमुची कुळदेवता ॥ १ ॥
थोर पडतां सांकडें । गुरु रक्षी मागें पुढें ॥ २ ॥
काया वाचा आणी मन । गुरुचरणींच अर्पण ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं शरण । गुरु एक जनार्दन ॥ ४ ॥

१ जनार्दन स्वामी. २ जनार्दन स्वामींना दत्तानुग्रह झाल्याबद्दल नाथांची साक्ष. ३ सगुण साक्षात्काराची शक्यता. ४ वरील ओव्यांचा विचार. ५ नाथांच्या गुरुसेवेचा प्रकार. ६ गुरुमानसपूजा. ७ युद्धाचा प्रसंग. ८ अडक्याची चूक.

१ जनार्दनस्वामी हे मूळचे चाळीसगांवचे देशपांडे. हे ऋग्वेदी आश्वलायनसूत्री देशस्थ ब्राह्मण. यांचा जन्म शके १४२६ फाल्गुन वद्य ६ या दिवशीं झाला. हे पूर्वकर्मऋणानुबंधानें यवनांच्या सेवेंत पडले ते वाढत वाढत देवगड उर्फ दौलताबाद तर्फेचे मुख्य अधिकारी व यवन पातशाहाचे विश्वासु मुत्सद्दी झाले. हे मोठे शूर, करारी स्वभावाचे, फार टापटिपीचे व तेजस्वी पुरुष होते. हे आपल्या कामांत फार वाकबगार असल्यामुळें बादशाहीमध्यें यांचें चांगल वजन असे. तथापि यांची कीर्ति मुख्यतः सत्पुरुष या नात्यानेंच विशेष पसरली होती व त्या तशा काळांतही यांच्या स्वधर्मनिष्ठचा दुंदुमी चोहोंकडे सारखा दुमदुमून राहिला होता.

यांना श्रीदत्ताची उपासना होती व श्रीदत्ताच्या सगुणरूपाचें साक्षात् दर्शन होत असे. पांहटे उठल्यापासून तों मध्यान्हकालापर्यंत स्नानसंध्या, समाधि व दत्तसेवा यांत ते निमग्न असत. यांचा दुपारचा वेळ कचेरींचें काम पाहण्यांत जाई. पुन्हां सायं-संध्या वगैरे आटपून रात्रीं हे ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांचें निरूपण करीत. यांच्या समाधीची जागा एकांतस्थळीं नियमित झाली असून तिकडे मनुष्य फिरकायचा नाहीं असा बंदोबस्त होता. हे जसे दयाळु व न्यायी होते तसा यांचा सर्वांना वचकही असे. यांच्यासाठीं पातशाही हुकुमावरून देवगडावर दर गुरुवारीं कचेऱ्यांना सुट्टी होती. योग्यांना सुद्धा दुःसाध्य असा सेवाधर्म हे चालवीत असून स्वधर्माचरणापासून लवमात्र च्युत झाले नव्हते. प्रपंच व परमार्थ हे दोन्ही योग हे उत्तम चालवीत असत. श्रीदत्ताच्या सगुणसाक्षात्कारामुळें त्यांच्या ठिकाणीं समता, शांति, व अनासक्ति या नांदत होत्या. यांची अंगकांतिही दिपवणारी होती. 'बाहेरी कर्मे क्षाळला। भीतरीं ज्ञानें उजळला' असा हा भक्तिज्ञानवैराग्याचा पुतळा हिंदुमुसलमानांना सारखाच पूज्य वाटे. जनार्दनस्वामींच्या भक्तीला प्रसन्न होऊन दत्तमहाराजांनीं देवगडावरच वस्ति केली, त्यामुळें आणि नित्य भजनपूजन व आत्मचर्चा यांच्या दिव्य परिमळानें 'देवगड' चा परिसर पुण्यपावन होऊन गेला.

२ श्रीदत्तांनीं जनार्दनस्वामींवर अनुग्रह केला व त्यास स्वरूपानुभव देऊन कृतार्थ केलें; त्या प्रसंगाची हकीकत खुद्द एकनाथ

महाराज भागवतांत (अ० ९) सहज स्फूर्तीनें बोलून गेले आहेत ! ते ह्मणतात:—

गुरुप्राप्तिलागीं सर्वथा । थोर जनार्दनासी चिंता ।
विसरला तिन्ही अवस्था । सद्गुरु चिंतितां चिंतनीं ॥ ४३१॥
देवो भावाचा भोक्ता । दृढ जाणोनि अवस्था ।
येणें जालें श्रीदत्ता । तेणें हातु माथां ठेविला ॥ ४३२ ॥
हातु ठेवितांचि तत्काळ । बोधु आकळिला सकळ ।
मिथ्या प्रपंचाचें मूळ । स्वरूप केवळ स्वबोधें ॥ ४३३ ॥
कर्म करूनि अकर्ता । तोचि अकर्तात्मबोधु जाला देता ।
देहीं असोनि विदेहता । तेही तत्वता आकळिली ॥४३४॥
गृहाश्रमू न सांडितां । कर्मरेखा नोलांडितां ।
निजव्यापारीं वर्ततां । बोधू सर्वथा न मैळे ॥ ४३५ ॥
तो बोधु आकळितां मना । मन मुकलें मनपणा ।
अवस्था नावरेचि जनार्दना । मूर्छापन्न पडियेला ॥ ४३६ ॥
त्यासी सावध करूनि तत्वता । म्हणे प्रेमा राहे सत्वावस्था ।
तोहि गिळोनि सर्वथा । होयीं वर्तता निजबोधें ॥ ४३७ ॥
पूजाविधी करोनियां । जंव जनार्दनु लागला पायां ।
तंव अदृश्य जाला दत्तात्रेया । योगमायेचेनि योगें ॥४३८॥

श्रीदत्तात्रेयांनीं २४ गुरु केल्याची सुंदर कथा विस्तारानें तीन अध्यायांत सांगितल्यावर दत्तात्रेयशिष्यपरंपरा सांगण्याच्या ओघांत

नाथमहाराज वरील गुजगोष्ट बोलून गेले ! एवढी महत्वाची गोष्ट लौकिकांत सांगण्यासारखी नाहीं. कारण अश्रद्धाळु विचिकित्सक व तर्कटी लोकांचा कलियुगांत भरणा फार असल्यामुळें ते नाथांनीं 'वृथा चावटी केली' असें सुद्धां म्हणण्यास चुकणार नाहींत. अशा लोकांचें स्मरण होऊन 'चुकूनि सांगितली गुरुगोठी' असें नाथांना मागून वाटलें ! तथापि 'दत्तात्रेयशिष्यकथन करितां । जनार्दन आठवला' त्यामुळें देहभान विसरून ते सद्गुरुप्रेमाच्या भरांत सद्गुरूंच्या चरित्रांतली ही अत्यंत महत्वाची गोष्ट सांगून गेले. हा त्यांनीं भाविकांवर महदुपकार केला आहे. वरील ओंव्यांचें महत्व सांगावें तितकें थोडेंच आहे.

२. वरील ओंव्यांचा आपण थोडासा विचार करूं. प्रथम आपण हें पूर्ण लक्ष्यांत ठेवावें कीं, परमात्म्याच्या ठायीं पूर्ण निष्ठा ठेवून तन्मय झालेल्या जीवाच्या उद्धारार्थ परमात्मा सगुणरूपानें प्रत्यक्ष प्रगट होतो ! इतक्या योग्यतेचा सत्वसंशुद्ध जीव अत्यंत विरळ असल्यामुळें असा प्रकार घरोघर सर्वांस पाहण्यास सांपडणें अर्थातच शक्य नाहीं;पण पामरांच्या अनुभवास जी गोष्ट येत नाहीं ती ते मिथ्या ह्मणत असले तरी ती मिथ्या नाहीं एवढें खास. कोणत्याही शास्त्रांतले सिद्धांत त्या त्या शास्त्रांत निष्णात असलेल्या पुरुषांच्या तोंडूनच जगाला ऐकावे लागतात. रोगाची परीक्षा वैद्याला, हिऱ्याची जवाहिऱ्याला, कुस्तीची वस्तादाला ! या प्रमाणें प्रत्येक शास्त्रांतला मर्मज्ञ अनुभवी जर त्या

त्या शास्त्रापुरता प्रमाणभूत मानण्यांत येतो, तर अखिल शास्त्रें ज्या अध्यात्मशास्त्राच्या पासंगालाही पुरत नाहींत त्यांतील गूढ प्रमेयांची ओळख संतांना-आणि संतांनाच केवळ-विचारली पाहिजे हें ओघानेंच येतें! सामान्य पामरांना, विषयी जीवांना व साधकांनाही सिद्धाच्या अनुभवाची यथार्थ कल्पना कशी होणार? म्हणून संतांच्या चरित्रांत सामान्यांना अकल्पनीय अशा कांहीं गोष्टी आल्या तर त्या खोट्या म्हणून दूर झुगारून देण्याचें धाडस त्यांनीं करूं नये! संत होऊन संतांस पहावें, भक्त होऊन भक्ताला जाणावें, ज्ञानी होऊन ज्ञान्याला ओळखावें, पण एवढा अधिकार आपणांस प्राप्त झाला नाहीं म्हणून संतांच्या गोष्टी सरसहा 'खोट्या व वेडगळ समजुतीच्या' म्हणून म्हणण्याच्या भानगडींत तरी पामर जीवांनीं पडूं नये, ही त्यांच्या हिताचीच गोष्ट आहे! सूर्याला नावें ठेवल्यानें त्याचा प्रकाश थोडाच कमी होतो? संत हे सूर्यासारखे आहेत. त्यांची खरी योग्यता विषयांच्या अंधःकारांत आपला संसार थाटणाऱ्या काजव्यांस करतां येणार नाहीं! सगुणसाक्षात्काराच्या किंवा संतचरित्रांत आढळणाऱ्या अनेक चमत्काराच्या गोष्टी मिथ्या नाहींत. भानुदासांच्या, नाथांच्या किंवा कोणत्याही स्वरूपाकार झालेल्या महात्म्याच्या चरित्रांतले चमत्कार हे चमत्कार नसून संतांच्या अनुभवाच्या दृष्टीनेंच संतांचीं सर्व चरित्रें पाहिलीं पाहिजेत. सगुणसाक्षात्काराची प्रतीति भक्तांना येत असते. जनार्दनस्वामींना

दत्तदर्शन झालें, अनुग्रह झाला, नित्य दर्शन होई, जनार्दन-स्वामींनीं एकनाथांना दत्तदर्शन करवून दिलें, दत्त नाथांच्या दारीं चोपदाराच्या वेषांत दासोपंतांना दिसले, नाथांच्या घरीं भगवंतांनीं बारा वर्षं श्रीखंड्याचें काम केलें इ० गोष्टींना आम्हीं चमत्कार म्हणतों. भाविक लोक त्यांवर केवळ विश्वास ठेवतात, पामरांना त्या खोट्या वाटतात व भक्तांच्या–अनुभवाच्या–प्रतीतीच्या–त्या गोष्टी आहेत ! असो.

४. जनार्दनस्वामींच्या चरित्रांतल्या अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीची म्ह० श्रीदत्तानुग्रहाची साक्ष खुद्द जनार्दनशिष्याकडून मिळाली ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. सद्गुरुप्राप्तीचा जेव्हां जनार्दन-स्वामीस इतका ध्यास लागला कीं जागृति, स्वप्न, सुषुप्ति, ह्या तीनही अवस्थांत त्यावांचून दुसरें कांहींच त्यांस सुचेना, तेव्हां भावाचा भोक्ता जे श्रीदत्तदेव ते साक्षात् प्रगट झाले व त्यांनीं त्यांच्या मस्तकीं हस्त ठेवला. श्रीदत्ताचा हस्त मस्तकीं पडतांच त्यांस स्वरूपसाक्षात्कार होऊन ‘ कर्म करून अकर्ता ’ अशा प्रकारचा अकर्तात्मबोध झाला म्हणजे देहींच विदेहता प्रगटली. गृहा-श्रम न सांडतां व कर्ममर्यादा न ओलांडतां भागा आलेला व्यवसाय करीत असतां आत्मानुसंधान न सोडण्याची युक्ति त्यांस साधली व त्याबरोबर मन मनपणास मुकून मूर्च्छा आली, तेव्हां श्रीदत्तांनीं त्यांस सावध केलें व परमानंदाच्या तो सात्विकपणाचा उमाळा गिळून

निजबोधानें सहजपणांत राहण्यास शिकविलें. नंतर श्रीदत्तांची पूजा करून जनार्दनस्वामी पायां लागले तों योगमायाबळानें दत्तमहाराज गुप्त झाले. जनार्दनस्वामींना प्रथम दत्तदर्शन होऊन अनुग्रह झाला त्या प्रसंगाचीं हकीकत त्यांच्या पट्टशिष्यानें वर लिहिल्याप्रमाणें दिली आहे. ' ग्रहाश्रमु न सांडितां । कर्मरेखा नोलांडितां ' निजबोधानें राहण्याचा उपदेश श्रीदत्तांनीं जनार्दनस्वामीस केला व तोच त्यांजपासून एकनाथांस मिळाला. जनार्दनस्वामी किंवा एकनाथ यांना गृहस्थाश्रमांत असंगपणानें ब्र० अकर्तात्मबोधानें राहण्याचा श्रीदत्तांनीं जो उपदेश केला तोच आपण ध्यानांत ठेवून त्याप्रमाणें जर वागूं तर गृहाश्रमींच भगवत्प्राप्ति होईल यांत शंका नाहीं. असो, जनार्दनस्वामीसारख्या पूर्ण पुरुषानें देवगडाहून वीसच कोसांवर असलेल्या आमच्या पैठणकर बालभागवतास आपल्या अचिंत्यशक्तीनें आपल्याकडे आकर्षून घेतले व त्यावर कृपेची पाखर घालून त्याला जगदुद्धार करण्यास समर्थ केले ही गोष्ट आनंदाची होय!

९ जनार्दनपंतांचें नाथांस प्रथम दर्शन होताक्षणींच उभयतांस परमानंद झाला. ध्रुवाप्रमाणें विरक्त झालेली ती नाथांची वामनमूर्ति पाहून जनार्दनपंतांस फार आनंद झाला व त्यांनीं त्यांस परमप्रेमानें जवळ ठेवून घेतलें. गुरुचा सदाचार, ब्रह्मनिष्ठा व प्रेमळपणा पाहून नाथांची चित्तवृत्ति त्यांच्या पायीं जडली. जनार्दन-

पंतांची नाथांनीं मनोभावानें सहा वर्षें अपूर्व सेवा केली व त्यांच्या अनुग्रहास ते पूर्ण पात्र झाले. नाथांच्या गुरुसेवेचा प्रकार असा होता:—गुरु उठण्यापूर्वीं शिष्यानें उठावें व रात्रीं गुरुचरणसंवाहन करून गुरु निद्रित झाल्यावर आपण त्यांच्या पायांतळीं निजावें. अहोरात्र गुरुसेवेला घरींदारीं तत्पर राहून मोठ्या उल्हासानें पडेल तें काम आज्ञेचीही वाट न पाहतां करावें. भोजनोत्तर प्रेमानें विडा तयार करून हातांत द्यावा व पंख्यानें वारा घालीत गुरूच्या विश्रामांत आपण विश्रांतीस जावें! स्नानाच पाणी उपसून स्नानास द्यावें, धोतराच्या निऱ्या करून हातीं द्याव्या, पूजेचें साहित्य करून पूजाप्रसंगीं सदा सान्निध राहून ज्या वेळीं जें पाहिजे तें हातीं द्यावें. गुरु समाधिस्थ असतांना शिष्यानें द्वारीं उभें राहून बाहेरील सर्व उपाधींचें निवारण करावें. गुरुगृहीं शागीर्द किंवा चाकरमाणसें असतांही त्यांच्या कामाची अपेक्षा न करितां आपण आपल्या आवडीनें तनमन सर्वस्व वेंचून गुरुपरिचर्या करावी. सर्व चाकरांचें काम करण्याची ईश्वरानें मलाच ताकद द्यावी असें हरिपाशीं नित्य मागावें! स्वतःची भूकतहान विसरून गुरूच्या भूकतहानेला अत्यंत जपावें. स्वतःची निद्रा खुंटीला अडकवून ठेवून गुरूची निद्रा यत्किंचित्‌ही भंग पावूं नये म्हणून दक्ष रहावें. स्वतः भोजन परिमित ठेवून गुरूचें भोजन यथेच्छ व्हावें म्हणून मनःपूर्वक धडपड करावी. स्वतः फार अन्न खाल्लें तर सुस्ती येऊन गुरुसेवेंत

अंतर पडेल म्हणून युक्ताहारविहार असावें. गुरूचा संतोष तो याचा संतोष, गुरूचे शब्द ते याचे शास्त्र, गुरूची मूर्ति तो याचा परमेश्वर, गुरूचें घर तें याचा स्वर्ग, गुरूचे आप्त ते याचे आप्त, किंबहुना 'गुरुःसाक्षात् परब्रह्म' अशा परम शुद्ध भावनेनें योनें गुरूची अखंड सेवा करावी! ह्या सहा वर्षांत नाथांना पैठणची आठवण झाली नाहीं, हेंच काय पण ते आपल्या देह-भावालाही सर्वथा विसरले! गुरुसेवा हाच परमधर्म मानून अवस्था-त्रयांत गुरुमूर्तिवांचून दुसरें कशाचेंही त्यांनीं चिंतन केलें नाहीं. गुरु-सेवा करितां करितां नाथांचे मनोविकार मावळले, क्षुधातृषादि प्राणधर्म सुटले, रागलोभादि रिपु त्यांचे शरीर सोडून गेले, इंद्रियें निर्वासन झालीं, काया लखलखित झाली व अंतःसमाधानाचें तेज देहावर फांकलें! गुरुसेवेनें नाथ देहाभिमानशून्य झाले. याप्रमाणें गुरुसेवेनें त्यांच्या चित्ताची शुद्धि होऊन गुरुप्रसादाला ते प्राप्त झाले. अशा शिष्यवृत्तींत असतांना त्यांनीं साक्षात् गुरुमुखांतून ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व श्रीभागवत ह्या ग्रंथाचें विवरण ऐकलें व त्यामुळें त्यांच्या ठिकाणचा आत्मबोध जागृत झाला. निव्वळ प्रापंचिकांना प्रपं-चावांचून जसा दुसरा विषय नसतो त्याप्रमाणें त्यांच्या श्रवण, मनन, निदिध्यास व साक्षात्काराला श्रीगुरुवांचून दुसरा विषयच उरला नाहीं. अर्धवट परमार्थी लोकांची मोठी त्रेधा उडून जाते. त्यांना श्रवण परमार्थाचें, मनन विषयांचें, निदिध्यास प्रपंचाचा व साक्षात्कार

दुःखाचा असतो!! नाथांना गुरुसेवेंत धन्यता वाटे. सेवा अभक्ताला कष्टप्रद वाटेल, पण नाथांसारख्या गुरुभक्ताला तीच परमामृतदात्री झाल्यामुळें फार भाग्याची वाटली. 'करावया भवनिर्दळण। मुख्य करावें गुरुभजन ' असें सांगून 'जो स्वरूपीं करीं समाधान। तोचि सद्गुरु सत्य जाण ' असें सद्गुरूचें लक्षण त्यांनींच भागवतांत केलें आहे. लौकिक विद्यांचे लौकिक गुरु पुष्कळ आहेत, पण स्वरूपीं स्थित करणारा तोच खरा सद्गुरु. तो कोटिभाग्यान प्राप्त झाला तरं सच्छिष्य त्याची सेवा कशी करितो ? नाथ म्हणतात (अ० १२):-

गुरु माता गुरुपिता ! गुरु स्वामी कुळदेवता ।
गुरुवांचोनि सर्वथा । आणिक देवता स्मरेना ॥ ४९४ ॥
कायावाचामनें प्राणें । जो गुरुवांचोनि आन नेणे ।
तैसाचि भजे अनन्यपणें । गुरुभक्ति म्हणणें त्या नांव ४९६
तहान विसरली जीवन । क्षुधा विसरली मिष्टान्न ।
कारितां गुरुचरणसंवाहन । निद्रा जाण विसरला ॥ ५०८
मुखीं सद्गुरूचें नाम । हृदयीं सद्गुगुरूचें प्रेम ।
देहीं सद्गुरूचें कर्म । अविश्रम अहर्निशी ॥ ५१० ॥
गुरुसेवेसी गुंतलें मन । विसरला स्त्रीपुत्रधन ।
विसरला मनाची आठवण । मी कोण हे स्फुरेना ॥५११॥

गुरु तोच भगवंत, गुरु तेंच परब्रह्म, गुरुभजन तीच हरिपूजा, गुरु व हरि वेगळे नाहींत, किंबहुना ' गुरुवाक्यें ब्रह्म सप्रमाण । येरवीं

ब्रह्मपण शब्दमात्र' असें नाथांनीं जागोजाग प्रतिपादलें आहे. गुरुसेवेचें मर्म नाथांनीं दुसऱ्या एका ठिकाणीं (अ० १० ) सांगितलें आहे:—

आसनीं भोजनीं शयनीं । गुरूतें न विसंबें मनीं ।
जागृतीं आणि स्वप्नीं । निदिध्यासनीं गुरु केला ॥ १३६ ॥
गुरुस्मरण करितां देख । स्मरणें विसरे तहानभूक ।
विसरला देहगेहसुख । सदा सन्मुख परमार्थ ॥ १३७ ॥

सद्गुरूचें सामर्थ्य व सद्गुरुसेवेचें सुख किती आहे याबद्दल नाथांचे प्रेमळ उद्गार पहा:—

सद्गुरु जेउती वास पाहे । तेउती सुखाची सृष्टि होये ।
तो म्हणे तेथ राहे । महाबोधु स्वानंदें ॥ १२२ ॥
त्या सद्गुरूचे देखिल्या पाये । तहानभूक तत्काळ जाये ।
कल्पना उठोंचि न लाहे । निजसुख आहे गुरुचरणीं ॥१२३॥

नाथांचा गुरुसेवेसंबंधाचा स्वतःच्या अनुभवाचा पुढील अभंग पहा.

सेवेची आवडी । विराम नाहीं अर्ध घडी ॥ १ ॥
नित्य करितां गुरुसेवा । प्रेमघडिभर होत जीवा ॥ २ ॥
आळस येवोंचि सरला । आराणुकेचा ठावो गेला ॥ ३ ॥
तहान विसरली जीवन । भूक विसरली मिष्टान्न ॥ ४ ॥
जांभईसी वाव पुरता । सवड नाहींच तत्वता ॥ ५ ॥
ऐसें सेवे गुंतलें मन । एका जनार्दनीं शरण ॥ ६ ॥

६ एके दिवशीं जनार्दनस्वामी समाधीस बसले असतां नाथ दारावर एकटेच गुरुचिंतन करीत बसले होते. 'आसनीं आणि शयनीं । भोजनीं आणि गमनागमनीं । सर्वकाळ निजध्यानीं' सद्गुपदाचें चिंतन करण्याचा त्यांचा अभ्यास नित्य चालूच होता. त्यांनीं एका अभंगांत म्हटलें आहे:—

चिंतनें नासतसे चिंता । चिंतनें सर्वकार्य ये हाता ।
चिंतनें मोक्षसायुज्यता । घर शोधीतसे ॥ १ ॥

ऐसें चिंतनाचें महिमान । तारिले अधम खळजन ।
चिंतनें समाधान । प्राणिमात्रा होतसे ॥ २ ॥

चिंतनें तुटे आधिव्याधी । चिंतनें तुटतसे उपाधी ।
चिंतनें होय सर्व सिद्धी । एका जनार्दनाचे चरणीं ॥ ३ ॥

द्रौपदीनें चिंतन करितांच भक्तसखा श्रीकृष्ण धांवला व त्यानें ऋषीश्वरांची मांदी क्षणांत तृप्त केली, अहोरात्र चिंतन करणाऱ्या अर्जुनाच्या रथावर तो सारथी होऊन बसला, चिंतनानें त्यानें प्रल्हाद जळींस्थळीं सांभाळिला, पायाचें चिंतन करणाऱ्या दामाजीसाठी तो महार झाला व आपल्या आजोबांच्या रक्षणार्थ वेळोवेळीं त्यानेंच नानारूपें घेतलीं—तोच सर्वगत, सर्वज्ञ, सर्वसाक्षी परमात्मा जनार्दनस्वामींच्या रूपानें प्रकट झाला आहे अशी दृढ भावना मनांत धरून नाथांनीं गुरूंची मानसपूजा केली व गुरुपूजा करितांच आपलेपण विस-

रून गुरुस्वरूपांत ते मिसळून गेले. त्या प्रसंगीं त्यांनीं पुढील मनोहर अभंग केला आहे:—

मनोभाव जाणुनि माझा । सगुणरूप धरिलें वोजा ।
पाहुणा सद्गुरुराजा । आला वो माय ॥ १ ॥
प्रथम अंतःकरण जाण । चित्त शुद्ध आणि मन ।
चोखाळोनी आसन । स्वामीसी केलें ॥ २ ॥
अनन्यआवडीचें जळ । प्रक्षाळिले चरणकमळ ।
वासना समूळ । चंदन लावी ॥ ३ ॥
अहं जाळियेला धूप । सद्भाव उजळिला दीप ।
पंचप्राण हे अमूप । नैवेद्य केला ॥ ४ ॥
रजतम सांडोनि दोन्ही । विडा दिला सत्वगुणी ।
स्वानुभवें रंगोनी । सुरंग दावी ॥ ५ ॥
एका जनार्दनीं पूजा । देवभक्त नाहीं दुजा ।
अवघाचि सद्गुरुराजा । होवोनि ठेला ! ॥ ६ ॥

नाथांनीं याप्रमाणें सद्गुरु व परमात्मा हे वेगळे नाहींत अशा अभिन्न भावनेनें एकनिष्ठेनें सहा वर्षें गुरुसेवा केली व ती करितां करितां आपले वेगळेपणही विसरून गेले! अशी योग्यता एकनाथांची झाली हें पाहून जनार्दनस्वामींनीं त्यांस श्रीदत्ताचें दर्शन करून देण्याचा संकल्प केला पण त्या मनोहर प्रसंगाकडे वळण्यापूर्वीं दोन मनोरंजक आख्यायिका सांगून टाकूं.

७ एका गुरुवारीं जनार्दनस्वामी समाधींत निमग्न असतांना देवगडावर अकस्मात् परचक्राची धाड आली. सर्व गडावर एकच हलकल्लोळ उडाला. सेवकजन स्वामींकडे वर्दी पोंचविण्यास आले तेव्हां एकनाथ समाधिस्थानाच्या द्वारीं श्रीगुरुचिंतन करीत बसलेलें त्यांस आढळले. नाथांनीं पळाचाही विलंब न लावतां जनार्दनस्वामींचा लढाईच्या वेळचा सर्व पोशाख अंगावर चढविला व शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन कंबरेला तरवार लटकवून अश्वारूढ होऊन बाहेर पडले ! स्वामींचा समाधिभंगही होऊं नये आणि त्यांचें काम तर बिनबोभाट व चोख व्हावें म्हणून एकनाथांनीं ही हिकमत लढविली! रणवाद्यें वाजूं लागलीं. शस्त्रास्त्रांचा खणखणाट उडाला व चार घटका घनघोर रणकंदन होऊन शत्रु नामोहरम झाले व अपजय पदरीं बांधून पळून गेले. ह्या प्रसंगीं जनार्दनवेषधारी एकनाथांनीं शौर्याची इतकी शिकस्त केली कीं, सर्वांनीं तोंडांत बोटेंच घातलीं! गडावर जिकडे तिकडे जनार्दनस्वामींचीं स्तुति होऊं लागली, ती ऐकून 'गुरुशिष्यांचा अंतर्बाह्य पूर्ण अभेद आहे' हें लक्षण कृतीनें दाखविणारे एकनाथ समाधान पावले. गुरूंचा पोशाख जेथल्या तेथें ठेवून एकनाथ मुकाट्यानें आपल्या कामाला लागले. जनार्दनस्वामी समाधींतून व्युत्थानावर आल्यावर आपल्या वाड्यांत आले व फराळास बसले. गडावर व वाड्यांत जिकडे तिकडे विशेष प्रकारची धांदल त्यांना दिसली. एकनाथ

नेहमींप्रमाणें विनयानें गुरुसन्मुख उभे होते, पण झालेल्या प्रकाराबद्दल त्यांनीं मुखांतून एक अक्षरही काढलें नाहीं. "जाल्या वृत्तांताचें कथन । स्वमुखें न करूनि जाण । करीत श्रीगुरुसेवन । अहंकर्तेपण तेथें नाहीं;" (केशवकृत नाथचरित्र अ. २-५६) हा नाथांच्या अंगचा गुण ह्या प्रसंगीं प्रकट झाला. शत्रुसैन्याचा चार घटकांत फडशा पाडणारा आमचा हा वैष्णववीर गुरुसन्मुख आपल्या प्रतापाची प्रौढी न गातां किंबहुना त्याचें भानही न ठेवितां विनयानें उभा आहे, ह्या देखाव्याचें कोणी चितारी चित्र काढील तर तें हिंदु-मात्रास मोहित केल्यावांचून राहणार नाहीं. जनार्दनस्वामींस सर्व हकीगत कळल्यावर या थोर शिष्याची जी धन्यता वाटली ती लेखणीनें काय वानावी? आपल्या वेगळेपणाचा अभिमान लोपवून निरहंकारपणानें गुरुकार्य करणारे असे शिष्य परम दुर्मिळ आहेत!

८ नाथांची एकाग्रता विलक्षण होती. श्रीगुरुचरणांचें ध्यान करितां करितां त्यांचा देहभावही गलित व्हावा. परमार्थांत ज्याचें असें चित्तैकाग्र्य होत त्याचा प्रपंचही धडच होतो. संतांचा व्यवहारही चुकत नाहीं, किंबहुना संतांसारखा बिनचूक व्यवहार पंतांनाही साधत नाहीं! संत पंत असतात, पंत मात्र संत अस-तील वा नसतील. असो. एकनाथांची श्रद्धा, प्रेम व विश्वास पाहून जनार्दनस्वामींनीं त्यांजवर हिशेबाचें काम सोंपविलें. गुरु-

सेवेंत अंतर न पडूं देतां नाथ तें कामही गुरुसेवाच आहे ह्या भावनेनें लक्षपूर्वक करीत. एके दिवशीं हिशेबांत अडक्याची चूक पडली, ती शोधून काढण्यासाठीं नाथांनीं रात्रीं दिव्याला भरण घातलें व सर्व कामें आटोपल्यावर निश्चळपणानें ते ती चूक धुंडीत बसले! अडीच प्रहर रात्र उलटून गेली तरी ताळा पडेना. देहाचा शीण मानला नाहीं, क्षणभर सुद्धां अंग आडवें टाकलें नाहीं, उपहारावर पाणी प्याल्यास निद्रा—आळस—येईल म्हणून झोंपही घेतली नाहीं, याप्रकारें अंगावर घेतलेलें काम निरलसपणानें तडीला नेण्यांत नाथांनीं कसूर केली नाहीं. काम लहान असो थोर असो, —अंगावर घेतलें किंवा येऊन पडलें ह्मणजे—तो स्वधर्म समजून अत्यंत आस्थेनें करणें हा श्रेष्ठांचा स्वभाव असतो. कर्तव्यासाठीं कर्तव्य करणें हें थोरांचें शील असतें. ह्या शीलाला अनुसरून नाथ अडक्याची चूक शोधून काढण्यांत गुंग झाले होते. तीन प्रहर रात्र झाली तेव्हां जनार्दनस्वामी जागे झाले व नाथ जवळपास कोठें दिसेनात म्हणून ते शेजारच्या खोलींत डोकावूं लागले. कांहीं वेळांत नाथांनीं अडक्याची चूक शोधून काढली व हिशेबाचा ताळा पडलेला पाहतांच हर्षनिर्भर होऊन त्यांनीं आनंदानें टाळी पिटली. जनार्दनस्वामींस कौतुक वाटून ते पुढें सरले व कसला एवढा आनंद तुला झाला आहे?' म्हणून विचारतांच नाथांनीं सर्व सांगितलें. त्यावर जनार्दनस्वामी ह्मणाले, "नाथा! तुला

अडक्याची चूक सांपडली तर इतका आनंद झाला आहे, तर मग संसाराची जी मोठी चूक तुझ्या हातून झाली आहे ती सांपडल्यास तुला किती आनंद होईल बरें? बाळा, असाच लय श्रीदत्तचिंतनीं लावलास तर महाराज काय दूर आहेत?" यावर नाथांनीं रोमांचित होऊन व गुरुमहाराज आतां दत्तदर्शन खास करवितील ह्या आशेनें उत्कंठित होऊन सद्गुरूच्या पायीं लोटांगण घातलें !

## ४ श्रीदत्तकृपा व अनुष्ठान.

एका जनार्दनीं परब्रह्मपुतळा ।
दत्त देखिला डोळां आत्मदृष्टी ॥ १ ॥

१ एकनाथांस श्रीदत्तदर्शन. २ दत्तमानसपूजेवरचे नाथांचे उत्कृष्ट अभंग. ३ श्रीदत्तभेटीचे प्रसंग. ४ नाथांचें अनुष्ठान. ५ ' आम्हां डंखूं आला काळ । परी तो काळचि झाला कृपाळ '.

१ जनार्दनस्वामींच्या समाधीचें स्थान देवगडावर उत्तर दिशेस एकांतांत असे. त्या स्थानासमोर एक रम्य सरोवर असून सभोंवार पुष्पफळांनीं शोभायमान अशा वृक्षांची गर्दी होती. तिकडे कोणी फिरकायचें नाहीं अशी स्वामींची ताकीद असल्या-मुळें जनांच्या पायरवानें न रुळलेलें, पाहतांच समाधीस बोलावणारें व स्वर्गतुल्य असें तें एकांत स्थान होतें. त्या शुचिप्रदेशांत स्थिर आसन घालून स्वामी रोज प्रहरभर समाधिसुख भोगीत असत, व गुरुवारचा तर सगळाच दिवस त्यांचा तेथेंच जाई. त्याठिकाणीं साक्षात् श्रीगुरूच्या दर्शनसंभाषणादिकांचा त्यांस लाभ होई. श्रीदत्तदर्श-नाचा योग नाथांसही प्राप्त व्हावा असें स्वामींस एकदां वाटलें. त्यांनीं नाथांस एकदा आधी ' येथें श्रीदत्तावांचून दुसरे कोणीही येत नाहीं व दत्तमहाराज कोणत्याही वेशांत आले तरी तूं बिचकूं नकोस ' असें बजावून ठेवल्यामुळें एकनाथ श्रीदत्तदर्शनाची वाट पहात

बसले. स्वामींची पूजा आटोपल्यावर श्रीदत्त मलंगवेषानें प्रकट झाले. सर्वांग चर्मानें वेष्टिलें आहे, बरोबर कुत्रीच्या रूपांत दिसणारी कामधेनु आहे, नेत्र आरक्त झाले आहेत असें तें भयानक रूप पाहून नाथ अमंळ चकि..
आत्मसुखाच्या गोष्टी बोलत ब
त्या कामधेनूचें दूध काढलें
यथेच्छ भोजन करून आपल
दिला. भोजनोत्तर तें पात्र धुवून
हातीं दिलें, व नाथांनीं [illegible] प्रसाद, हाच भागीरथी, व हेंच स्वानंदावाप्तीचें साधन ' अशा शुद्ध भावनेनें तें सर्व जळ प्राशन केलें! तें जाणून श्रीदत्तांनीं नाथास जवळ बोलाविले. हा परमप्राप्तीचा समय जाणून नाथांनीं उभयतांच्या चरणीं लोटांगण घातलें व ते हात जोडून सन्मुख उभे राहिले, तों गुरु तेच परमगुरु व परमगुरु तेच गुरु अशा अभेद भावनेनें त्यांस क्षणैक ताटस्थ्य प्राप्त झालें. नाथ वृत्तीवर आले तेव्हां श्रीदत्तांनीं त्यांजकडे प्रसन्नमुखानें पाहिलें व जानार्दनस्वामींकडे वळून ते म्हणाले. " हा महाभागवत जन्मास आला असून याच्या हातून भागवतधर्माचा प्रसार होणार आहे. हा हजारों लोकांस भक्तिपंथास लावील व जडजीवोद्धार करण्यासारखे उत्कृष्ट ग्रंथही निर्माण करील. हा भागवतावर एक अपूर्व ग्रंथ लिहील." असें बोलून

श्रीदत्तांनीं नाथांस आलिंगिलें. तेव्हां जनार्दनस्वामींस परमानंद झाला व 'दत्त जनार्दन एकनाथ' हे तिघेही समरसता पावले. श्रीदत्तांनीं आपल्या निजरूपाचें जेव्हां नाथांस दर्शन दिलें तेव्हां दत्त, जनार्दन व आपणासकट सकळ विश्व त्यांनीं अभेदरूपानें पाहिलें:—

**अभंग.**

गातो एका ध्यातो एका । अंतरबाहिर पाहतो एका ॥ १ ॥
अगुणीं एका सगुणी एका । गुणातीत पाहतों एका ॥ २ ॥
जनीं एका वनीं एका । निरंजनीं देखों एका ॥ ३ ॥
संतजना पाढिये एका । जनार्दना काडिये एका ॥ ४ ॥

२ यानंतर श्रीदत्त गुप्त झाले व जनार्दनस्वामी आपल्या कामास गेले. नाथांस दत्तदर्शनाचा परमानंद झाला. जें सगुणरूप आपण डोळ्यांनीं पाहिलें तेंच अ-त्रि म्हणजे गुणत्रयातीतता व अनसूया म्हणजे असूयाराहित्य अथवा 'कोणाही जातीचा न घडो मत्सर' अशा प्रकारची बुद्धि म्हणजेच बुद्धि आणि बोध ह्या दांपत्याच्या संयोगापासून उत्पन्न होणारें निर्गुणरूप होय. सगुण निर्गुण एकच. दत्त तोच कृष्ण, तोच विठ्ठल व तोच राम. ज्या स्वरूपांत त्याचें ध्यान करावें त्याच रूपांत तो प्रकट होणारा आहे. तो दत्त आहे म्हणजे त्यानें आपलें स्वरूप आधींच दिलेलें आहे; तो साधनांनीं प्राप्त होणारा नसून प्राप्त झालेलाच आहे! त्याच्या प्राप्तीला सायास नको आहेत. तो सहजसिद्ध आहे, फक्त बुद्धीवर आलेलें

देहअहंतेचे पदर गुरुकृपेनें दूर झाले कीं तो दत्तच आहे. पाण्या-वर आलेलें शेवाळ दूर केलें कीं जल जसें सिद्धच असतें तसें स्वरूप सिद्धच आहे. याप्रमाणें सगुण तेंच निर्गुण व निर्गुण तेंच सगुण हें यथार्थ ज्ञान होऊन 'घृत थिजलें तेंच विघुरलें । परी घृतपणा नाहीं मुकलें । तेवीं अमूर्त मूर्ती मुसावलें । परी तें संचलें परब्रह्म' ( श्रीना-नाथ भागवत अ० १–२४६ ) अशी प्रतीति आली तेव्हां 'माझी दत्त ती माउली । प्रेमपान्हा पान्हावली' असें म्हणत व आनंदानें गातनाचत नाथांनीं दत्तपूजा केली. त्या वेळचे अभंगः—

१.

केलें आवाहन । जेथें नाहीं विसर्जन ॥ १ ॥
भरला ओतप्रोत । स्वामी माझा देवदत्त ॥ २ ॥
गातां येत नाहीं । पूर्ण सुलीनता पाही ॥ ३ ॥
**एका जनार्दनीं** खूण । विश्वीं भरला परिपूर्ण ॥ ४ ॥

२.

चोहों देहांची क्रिया । अर्घ्ये दिलीं दत्तात्रेया ॥ १ ॥
जें जें कर्मधर्म । शुद्ध सबळ अनुक्रम ॥ २ ॥
इंद्रियक्रियाजात । कांहीं उचित अनुचित ॥ ३ ॥
आत्मा माझा देव दत्त । **एका जनार्दनीं** स्वस्थ ॥ ४ ॥

३.

संचित क्रियमाण । केलें सर्वांचें आचमन ॥ १ ॥

प्रारब्धशेष उरलें यथा । तेणें ध्याऊं सद्गुरु दत्ता ॥ २ ॥
झालें सकळ मंगळ । एका जनार्दनीं फळ ॥ ३ ॥

४.

सकळ देवांचा जनिता । त्रिगुणसत्ता चालविता ॥ १ ॥
शरण जातां त्याच्या पायां । सर्व हारपली माया ॥ २ ॥
भेदाभेद निवारिलें । सर्व स्वरूप कोंदलें ॥ ३ ॥
एका जनार्दनीं शिवें । जीवपणा मुकलों जीवें ॥ ४ ॥

५.

सहस्रदल कमलाकार । कंठीं अर्पियेले हार ॥ १ ॥
सोळा बारा अठरा चार । माथां वाहूं पुष्पभार ॥ २ ॥
एका जनार्दनीं अळिकुळ । दत्तचरणाब्जानिर्मळ ॥ ३ ॥

६.

ज्ञानदीपिका उजळली । नाहीं चिंतेची काजळी ॥ १ ॥
ओवाळिला देव दत्त । प्रेमें आनंदभरित ॥ २ ॥
भेदाभेद मावळलें । सर्व विकार गळाले ॥ ३ ॥
एका मिळवी जनार्दन । तेजीं मिळाला आपण ॥ ४ ॥

७.

दत्त सबाह्य अंतरीं । दत्तात्रेय चराचरीं ॥ १ ॥
दत्तात्रयें माझें मन । हरोनि नेलें मींतूंपण ॥ २ ॥

मूळ सिंहाद्री–पर्वतीं । दत्तात्रेयें केली वस्ती ॥ ३ ॥
भक्ता मनीं केला वास । **एका जनार्दनीं** विश्वास ॥ ४ ॥

३. श्रीदत्तांचें दर्शन ह्यापुढें नाथांस हवें तेव्हां होऊं लागलें. श्रीदत्तवरानेंच नाथांनीं आपला भागवत ग्रंथ केला. त्यांत नाथांनीं कोठें कोठें प्रेमभरानें दत्तभेटीचे उल्लेखही केले आहेत. उपोद्घातांत 'आतां नमूं दत्तात्रेया । जो कां आचार्यांचा आचार्या । तेणें प्रवर्तविलें ग्रंथ-कार्या । अर्थवावया निजबोधू' ( १४१ ) असें म्हटलें आहे. तसेंच भिक्षुगीताच्या अखेरीस ( अध्याय २३ )

माझे निजगुरूचाही गुरु । श्रीदत्त परमगुरु ।
तो भिक्षुगीतार्थें साचारु । योग्यां योगेश्वरु तुष्टला ॥ १००० ॥
तेणें तोखलेनि अद्भुतें । आदरें आश्वासूनि मातें ।
अभय देऊनि निजहस्तें । पूर्ण ग्रंथार्थें डुल्लतु ॥ १००१ ॥

ह्या ठिकाणीं नाथांनीं स्पष्ट सांगितलें आहे कीं " माझे परमगुरु व योग्यांतले योगेश्वर जे श्रीदत्तमहाराज ते भिक्षुगीतार्थानें फार संतोष पावले व **आदरानें मला अश्वासून व निजहस्तानें अभय देऊन** आनंदानें डोलूं लागले. " नाथांचे हे उद्गार फार महत्वाचे आहेत. ह्यावरून नाथांच्या मुखांतून भिक्षुगीत ऐकून श्रीदत्त प्रसन्न झाले व त्यांनीं आपल्या हातांनीं नाथांची पाठ थोपटली असें स्पष्ट ठरतें. त्याचप्रमाणें 'एकाएकीं एकला काशीवासा गेला' ह्या अभंगांत नाथांनीं सांगितलें आहे कीं:—

मुक्तमंडपामाझारी निजनामगजरीं ।
दत्त प्रकटला कीर्तनामाझारी ॥ ३ ॥
दत्त स्थावरीं जगमीं विश्वीं विश्व धरीं ।
तोचि घरोघरीं नित्य भिक्षा करीं ॥ ७ ॥

असो. सद्गुरु जनार्दनकृपेनें नाथांस श्रीदत्तांचें साक्षात् दर्शन झालें व त्यानंतर ते निरंतर नाथांच्या संगतीं असत. नाथांनीं स्मरण करावें तेव्हां सगुणरूपानें प्रकट व्हावें, एरवीं सर्वकाळ त्यांच्या हृदयीं वास्तव्य करावें, याप्रमाणें श्रीदत्तमहाराज जनार्दनकृपेनें नाथांस स्वहृदयींच आंतुडलें.

४. नाथांस श्रीदत्तदर्शन व दत्तवरप्रसाद झाल्यानंतर जनार्दनस्वामींस वाटलें कीं 'याला आतां अनुष्ठानास बसवावें.' त्याप्रमाणें त्यांनीं देवगडावरच पण वायव्यदिशेस शूलभंजन उर्फ सुलभ पर्वतावरची रम्य जागा त्यास नेमून दिली व कर्तव्यार्थाचा बोध करून आणि श्रीकृष्णाची उपासना देऊन शुभ मुहूर्तावर तेथें पाठविलें. नाथ त्या स्थळीं गेले तेव्हां मार्केडेय ऋषीचें तें पुरातन तपारण्य पाहून व तेथील सूर्यकुंडाचें स्नान करून त्यांस फार आनंद झाला. नाथांनीं आपली तपश्चर्येची जागा स्वच्छ करून घेतली व तेथेंच स्थिर आसन मांडून ते राहिले. तेथें थंडीवाऱ्याची त्यांना भीति वाटली नाहीं, क्षुधाशमनार्थ काय करावें याची त्यांनीं चिंता केली नाहीं, आणि श्रीगुरुदेव योगक्षेम चालविण्यास व सर्व-

प्रकारें सांभाळ करण्यास पूर्ण समर्थ आहेत अशी दृढ निष्ठा ठेवून त्यांनीं तपास आरंभ केला. 'ब्राह्मे मुहूर्ते चोत्थाय चिंतयेदात्मनो हितम्' ह्या वचनाप्रमाणें ब्राह्ममुहूर्तीं उठून स्नानसंध्यादि सारून व पूर्वाभिमुख सिद्धासनावर बसून त्यांनीं श्रीकृष्णमूर्तीचें ध्यान करीत असावें. मनानें श्रीकृष्णमूर्तीचें ध्यान व षोडशोपचार पूजा करावी, आणि गुरुदर्शित मार्गानें भगवत्पदप्राप्तीचें अखंड साधन करीत असावें. भगवंतांनीं आपल्या गीतेंत ( अ० ६ ) सांगितल्याप्रमाणें शुचि प्रदेशांत स्थिर आसनावर आरूढ होऊन:—

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥
प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥

अशा प्रकारचा अभ्यासयोग त्यांनीं चालविला व ह्या अभ्यासांत असतां बाह्य स्फुरण मावळून देहींच विदेहपणाचा सुखसोहळा त्यांनीं भोगला. नाथांना जनार्दनस्वामींनीं ब्रह्मबोध करून सगुणभक्तीचें वर्म सांगितलें होतें त्याप्रमाणें ते भक्तिसुखानंद भोगीत होते. ब्रह्मज्ञान सांगून सगुणभक्तीचा उच्छेद करणारे जे गुरु आहेत त्यांपैकीं जनार्दनस्वामी नव्हते. सगुण—निर्गुण एक असा त्यांचा बोध होता. प्राणायाम, ध्यान, धारणा इ० सर्व भक्तीचीं साधनें आहेत, कर्मज्ञानयोगादि साधनें असून श्रीहरि हाच साध्य आहे

असें त्यांनीं ह्या शिष्याच्या मनावर बिंबवलें होतें. लवणकण सांगरांत विरघळून जातो त्याप्रमाणें हरिरूपांत मिळून जावें असा त्यांचा उपदेश होता. नाथांनीं वर सांगितलेला योग योगासाठीं चालविला नाहीं,तर श्रीहरीसाठीं चालविला.योगासाठीं योग,तपासाठीं तप,कर्मासाठीं कर्म, व ज्ञानासाठीं ज्ञान अशी भागवतधर्माची शिकवण नसून योग, तप, कर्म व ज्ञान हीं सर्व श्रीहरीसाठीं आहेत. हरीवांचून यांना कसरतीपेक्षां ज्यास्त किंमत नसून हीं हरीची प्राप्ति करून देतील तरच यांची किंमत आहे हें भागवतधर्माचें मुख्य तत्व आहे. गीता व भागवत हे संस्कृत ग्रंथ व ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे प्राकृत ग्रंथ हेंच शिकवीत आहेत व ह्या ग्रंथांचें निरूपण गुरुमुखानें ऐकतां ऐकतां नाथांच्या चित्तावर हेंच ठसलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं श्रीकृष्णमूर्तीचें ध्यान परम भक्तीनें करण्याचा अभ्यास ठेवला होता. त्या अभ्यासाचें पूर्ण फळ मिळून श्रीकृष्णाचें नाथांस साक्षात् दर्शन झालें.

त्या गडावर ह्याप्रमाणें नाथांची तीव्र तपश्चर्या चालली होती. एके दिवशीं नाथ समाधिस्थ असतांना एक भला मोठा काळसर्प त्यांच्या अंगावर धांवून आला व त्यानें त्यांच्या पोटाला विळखा घातला! पण आश्चर्य हें कीं साम्यस्थितीचा अनुभव घेणाऱ्या नाथांच्या अंगस्पर्शामुळें त्याची दंश करण्याची क्रूरबुद्धि मावळली व तोच नाथांच्या मस्तकावर फडा उभारून आनंदानें डोलूं लागला! चित्त-

शुद्ध पुरुषाला सर्प, विंचु, व्याघ्र, व सिंह सुद्धां पीडा करूं इच्छीत नाहींत. याच्या ठिकाणचा भेदभाव मावळला कीं जगांतला भेद गेला! हें सर्व आपल्यापाशींच आहे.

सर्व भूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ गीता. ६–२९ ॥

अशा प्रकारची ऐक्याचळाची स्थिति ज्याला प्राप्त झाली त्याला पीडा करायला ब्रांह्मडांत कोण समर्थ आहे? जो आपणांत विश्व पाहतो व विश्वांत आपण भरून राहतो त्या समविषमभावशून्य पुरुषाला कोणापासून भय आहे? भय सारें दुजेपणाच्या पोटीं आहे. तो दुजेपणाच जे गिळून बसले ते जगांत निर्भयच आहेत! असो. तो सर्प यानंतर नाथांचा सवंगडीच बनला. नाथ समाधिस्थ बसले कीं यानें त्यांच्या अंगाला विळखा घालून मस्तकावर फडा करून डोलत बसावें व ते समाधींतून व्युत्थानावर येऊं लागले-म्हणजे यांच्या देहांत थोडी हालचाल सुरूं झाली–कीं यानें निघून जावें, असा क्रम बरेच दिवस चालला होता. नाथांना याची खबरही नव्हती. ही गोष्ट एके दिवशीं पुढीलप्रमाणें उघडकीस आली. त्या डोंगराच्या पायथ्यासी एक भाविक शेतकरी राहत होता. त्यानें गुरें चारीत असतां एकदां नाथांस सहज पाहिलें. तेव्हां हा मोठा ऋषि येथें तप करीत बसला आहे असें पाहून त्यानें नाथांस भक्तीनें नमस्कार केला. त्या दिवसापासून तो रोज एका गाईचें दूध एका तपे-

त्यांत भरून तें नाथांस आणून देत असे. नाथही त्याचा शुद्ध भाव जाणून तें दूध रोज समाधींतून उठल्यावर पीत असत. एके दिवशीं त्या सर्पानें नाथांच्या कंबरेला विळखा घातला असतां तो शेतकरी दुधाचें भांडें घेऊन वर आला व हा प्रकार पाहून घाबरून जाऊन त्यानें मोठ्यानें किंचाळी फोडली. लगेंच नाथ व्युत्थानावर आले व सर्पास जातांना पाहून त्यांनीं आपल्या भांड्यांतलें दूध त्याला प्यावयास दिलें. या प्रसंगावर नाथांनींच एक अभंग केला तो असा आहेः—

आम्हां डंखूं आला काळ । तंव तो काळचि जाला कृपाळ ॥१॥
भली ओळख झाली आतां । चित्त मीनलें अच्युता ॥ २ ॥
देहीचा फिटला संदेह । तंव काळचि झाला वाव ॥ ३ ॥
एकाजनार्दना भेटी । येणें जाणें खुंटली गोठी ॥ ४ ॥

ह्यापुढें नाथांनीं गुर्वाज्ञेप्रमाणें आपलें अनुष्ठान संपविलें व गुरुगृहीं आलें. त्यांनीं ती सर्व हकीकत गुरूस सांगितली, ती ऐकून जनार्दनस्वामींनीं विचार केला कीं 'आतां याचें गडावरचें काम संपलें, याला आतां तीर्थयात्रेस पाठवावें म्हणजे अनेक संतमहंतांच्या गांठी पडून पुढें हा श्रीगुरुदेवदत्तांच्या वराप्रमाणें भागवतधर्माचा मोठा प्रवर्तक होईल.'



# ५ नाथांच्या तीर्थयात्रा.

जे तीर्थी जें विधान। जे तीर्थी जें स्नान।
तैसें करोनि दान सन्मान। सुखी जन श्रीरामें केलें ॥

भावार्थरामायण.

१ चंद्रभटाची भेट व नाथांचा पहिला ग्रंथ चतुःश्लोकी भागवत. २ नाथांच्या तीर्थयात्रा. ३ पैठणास चक्रपाणीची अवस्था. ४ नाथांची भेट.

१ जनार्दनस्वामींनीं नाथांस तीर्थयात्रेस जाण्याची आज्ञा केली व आपण स्वतः नाशिकत्र्यंबकेश्वरपर्यंत बरोबर येण्याचें कबूल केलें. गुरुशिष्य दोघेही तीर्थयात्रेच्या मिषानें आपल्या पादस्पर्शानें अवघी भूमि पावन करावयास निघाले. येतां येतां एके रात्रीं गोदातीरीं चंद्रभट नामक एका ब्राम्हणाचा आश्रम होता त्याच्या आश्रमांत त्यांनीं वस्ती केली. तो ब्राम्हण महान् तपोनिष्ठ होता. स्नानसंध्यादि कर्मे सारून तेथें निवांतस्थळीं परमार्थसाधन करून तो रहात होता. हे गुरुशिष्य रात्रीं त्याच्या आश्रमीं राहिले, व त्यानेंही त्यांचें मनोभावें आतिथ्य केलें. रात्रीं फराळ झाल्यावर त्या ब्राम्हणाच्या मुखांतून यांनीं चतुःश्लोकी भागवताचें सुंदर निरूपण ऐकलें. तें ऐकून जनार्दनस्वामींनीं चतुःश्लोकीं भागवतावरच ओवीवृत्तांत ग्रंथ करण्याची नाथांस आज्ञा केली. नाथांनीं त्यावर अहोरात्र मनन चालविलें.

दुसरे दिवशीं गुरुशिष्य निघून पंचवटीस आले. तो ब्राह्मणही (त्यांच्या संगतिसुखाला लोभून) त्यांच्याबरोबर आला. तेथें श्रीराम-मंदिरांत त्यांनीं बिऱ्हाड ठेवलें. फराळ वगैरे आटोपल्यावर नाथांनीं श्रीराममंदिरांत सद्गुरुसमक्ष श्रीरामापुढें स्वरचित ओव्यांमध्यें पुराण सांगितलें. तोच नाथांचा प्रथम ग्रंथ होय! नाथांचें चतुःश्लोकी भागवत हा त्यांचा पहिला ग्रंथ असून अत्यंत प्रौढ व सुबोध आहे. ही चतुःश्लोकी मूळ भागवताच्या द्वितीय स्कंधांत (अ० ९) आहे. ह्या चार श्लोकांत आदिनारायणांनीं ब्रह्मदेवास अध्यात्मरहस्य सांगितलें आहे. ब्रह्मदेवानें नारदाला, नारदांनीं व्यासांना व व्यासांनीं बारा स्कंधांत त्याचा विस्तार करून शुकाला व शुकानें परिक्षितीला सांगितलें. भागवतग्रंथाचें बीज ह्या चतुःश्लोकींतच आहे. भागवतसांप्रदायाची जी मोठी कामगिरी नाथांकडून पुढें व्हावयाची होती तिच्या प्रारंभींच पंचवटीस त्यांजकडून आपणासमक्ष श्रीगुरूंनीं चतुःश्लोकी भागवतावर सुंदर ग्रंथ करविला हें ठीकच झालें. नाथांनीं प्रथमच गुरुस्तवनांत गुरुपुढें असे उद्गार काढले आहेतः—

आतां वंदूं श्रीजनार्दन । ज्याचें ऐकतां एक वचन ।
त्रैलोक्य होय आनंदघन । जो निजजीवन सच्छिष्यां ॥ ९॥

ज्याचे चरणींची माती । अवचटें लागल्या चित्तीं ।
तैं जन्ममरणा होय शांति । चारी मुक्ती बोळगण्या ॥ १०॥

नाथांची चतुःश्लोकी फारच अपूर्व आहे. नाथांचें वय लहान असून सिद्धवाणीची योग्यता ह्या प्रथम ग्रंथालाही आलेली आहे. नाथांनीं उपसंहारांत चंद्रभटाच्या आश्रमीं गुरुसह आपण गेलों असतांना त्यांच्या मुखानें हा ग्रंथ प्रथम ऐकला व नंतर गुर्वाज्ञेनें ह्या ओंव्या केल्या असें स्पष्ट म्हटलें आहे. तेथें नाथांनीं सांगितलें आहे कीं, मला ग्रंथकर्तृत्वाची बिलकूल ओळख नव्हती तरी गुर्वाज्ञेच्या सामर्थ्यामुळें हें काम माझ्याकडून पूर्ण झालें:—

नवल आज्ञेची समर्थता । मी करूं न रिघे ग्रंथा ।
तों ग्रंथार्थ मज आंतोता । बळेंचि ज्ञानार्था दाटूनि दावी ॥
गुरु–आज्ञा अतिशय लाठी । ग्रंथार्थीं खिळिली दिठी ।
आज्ञेनें पुरविली पाठी । फुकट गोठीमाजींही ज्ञान ॥
शब्दापुढें ज्ञान धांवे । ओवीपुढें अर्थ पावे ।
जें जें जीवीं विवंचावें । तें तें अवघे ग्रंथार्थ होय ॥

असो. पंचवटीहून गुरुशिष्य निघाले ते त्र्यंबकेश्वरास आले. त्र्यंबकेश्वरीं गोदेचें जन्मस्थान जो ब्रह्मगिरी डोंगर त्यास प्रदक्षिणा घालून व निवृत्तिनाथांच्या समाधीचें दर्शन होऊन त्यांस फार आनंद झाला. त्या ठिकाणीं त्यांनीं कांहीं अभंग केले. त्यांपैकीं पुढील एकच अभंग पहा.:—

धन्य आजी डोळां । स्वामी निवृत्ती देखिला ॥ १ ॥
कुशावर्तीं करूं स्नान । घेऊं निवृत्तिदर्शन ॥ २ ॥

प्रदक्षिणा ब्रह्मगिरी । चौऱ्यायशींची चुकली फेरी ॥ ३ ॥
गंगाद्वारीं स्नान करितां । हरे पयपानव्यथा ॥ ४ ॥
ऐसी तीन अक्षरें । एका जनार्दन स्मरे ॥ ५ ॥

तेथें गंगास्नान-ब्राह्मणसंतर्पणादि आटोपून व नाथांस पुढील तीर्थयात्रेचा क्रम सांगून जनार्दनस्वामी देवगडास निघून गेले. त्यांजबरोबर तो चंद्रभट ब्राह्मणही गेला. तो जनार्दनस्वामींच्या सेवेला तेथेंच राहिला. स्वामींनीं त्यावर पूर्ण अनुग्रह केला कांहीं कालानंतर त्या चंद्रभटानें गडावरच देह ठेवला. त्या ठिकाणीं त्याची समाधि बांधण्यांत आली. ती अद्याप यात्रेकरूंस पाहण्यास सांपडते.

२. असो. इकडे गुर्वाज्ञेनें नाथमहाराज तीर्थयात्रेस निघाले. दक्षिणोत्तर यात्रा करण्यांत यांनीं २।२॥ वर्षें काढलीं. निघतांना गुरुवियोगाचें त्यांस फार दुःख झालें, तेव्हां स्वामींनीं पोटाशीं धरून मीं सर्वकाळ तुझ्यासन्निधच–हृदयांतच–आहे’ असें प्रेमानें सांगितलें. नाथांचें हृदय लोण्याहून फार कोंवळें होतें. गुरूचे परम उपकार आठवून त्यांनीं मोठ्या कष्टानें त्यांची रजा घेतली. ‘योगक्षेम हरी चालविणार आहे त्याची तूं काळजी करूं नकोस, आपलें ज्ञान कोठें प्रकट करूं नकोस व संतमहंतांच्या भेटी घेत आपला स्वानंद आपल्याच ठिकाणीं भोगीत जा, म्हणजे तुला मिळालेलें पद स्थिर होईल’ असा गुरूनीं त्यांस बोध केला. ‘संतांची संगती

नामाचा निजध्यास । तेणें जोडे सौरस मग हातीं' एवढें सांगून ते म्हणाले:—

एकविध भाव सर्वांठायीं धरी । द्वैताची ती उरी उरवूं नको ॥१॥
हाचि अनुभव सुगम सोपारा । ययाची निर्धारा तरले बहु ॥२॥
ध्रुव उपमन्यु बिभीषण नारद । गाई गोपवृंद तरते झाले ॥३॥
म्हणे जनार्दन एकनाथा निजखूण । विटेवरी समचरण पाहे दृष्टी ॥४॥

असो. नाथांनीं चराचर जनार्दनरूप भावीत तीर्थयात्रा केल्या. केशवांनीं नाथचरित्रांत ( अ० ७ ) म्हटल्याप्रमाणें:—

मुखीं गुरूनामस्मरण । मनीं जनार्दनाचें ध्यान ।
सर्वेंद्रियीं समाधान । स्वयें स्वतंत्र निजरूपीं ॥ ६ ॥
श्रीकृष्ण जनार्दन अभिन्न । ऐसिया बोधें जो संपन्न ।
सबाह्य अंतर परिपूर्ण । आनंदचिद्घन कोंदला ॥ १७॥

अशा मनःस्थितीमध्यें अखंड राहून नाथांनीं सर्व यात्रा केल्या; पयोष्णी, नर्मदा, तापी, गंगा, यमुना, कावेरी, तुंगभद्रा, इत्यादि नद्यांचीं शतशःस्नानें केलीं; व अष्टविनायकांचीं स्नानें व ज्योतिर्लिंगें पाहिलीं. गोकुळ, मथुरा, वृंदावन हीं कृष्णकीर्तीनें दुमदुमलेलीं क्षेत्रें पाहून व तेथील भक्तिसुखानुभव घेऊन नाथांनीं गया, प्रयाग व काशी ही त्रिस्थळी यात्रा केली. कोठें एकरात्र, कोठें त्रिरात्र, कोठें पंचरात्र ह्याप्रमाणें त्यांनीं वस्ति करावी. अयोध्येची

यात्रा करून नाथ बद्रिकाश्रमास गेले. श्रीकृष्णांनीं निजधामास जाण्यापूर्वीं उद्धवास बोध करून भागवतधर्माचें आचरण करण्यास त्यास जेथें पाठविलें व जेथून उद्धवाच्या शिष्यप्रशिष्यांनीं भागवत धर्माचा प्रसार भरतखंडभर केला त्या बद्रिकाश्रमीं नाथांचें चित्त फारच रंगलें. नाथ तेथून द्वारकेस गेले. श्रीकृष्णचरित्राचें ध्यान करीत नाथांनीं द्वारकेचा सर्व प्रदेश पाहिला व कृष्णप्रेमानें त्यांचें अंतःकरण भरून गेलें. नाथ परम कृष्णभक्त असल्यामुळें द्वारकेंत असतांना संपूर्ण कृष्णलीलांच्या चिंतनांत त्यांनीं 'मुक्तीवरील भक्तिसुखाचा' आस्वाद घेतला. द्वारकेहून नाथ नरसीमेहत्याच्या जुनागडास आले व गिरनार पर्वतावर त्यांनीं कांहीं दिवस वस्ती केली. तेथून डाकुरास येऊन त्यांनीं कृष्णजीचें दर्शन घेतलें व याप्रमाणें यात्रा आटपीत नाथ गोदातीरानें पैठणच्या हद्दींत आले व पूर्वीं जेथें त्यांनीं आकाशवाणीचा गंभीर ध्वनि ऐकला होता त्या पिंपळेश्वराच्या देवळांत त्यांनीं तळ दिला. उत्तरेकडील यात्रा आटोपून नाथ आपल्या जन्मभूमीस परत आले.

ह्या वेळपर्यंत नाथांप्रमाणें आपणही पैठणास व नाथांच्या वृद्ध आजाआजींस विसरलों होतों, सबब आतां त्यांजकडे वळूं.

३ एकनाथ आपल्या वयाच्या १२ व्या वर्षीं घराबाहेर पडले व २५ व्या वर्षीं कृतार्थ होऊन परत आले. नाथ एकाएकीं नाहींसे झाल्यामुळें त्यांच्या आजाआजींनीं अपार शोक केला. त्यांनीं

गांवांतील सगळ्या विहिरी, तलाव व गंगेंतले डोह शोधून पाहिले, आसपासच्या गांवीं शोधार्थ माणसें धाडलीं, आपल्याकडून होईल तितकी शिकस्त केली पण त्यांना नाथांचा पत्ता लागला नाहीं. भानुदासांच्या घराण्यांतला हा एकुलता एक तंतु तुटून वंशाची नक्कल होते कीं काय अशी त्यांस व पैठणकर भाविकांस भीति वाटून सर्वांस फार वाईट वाटलें. मुलगा ऐन तारुण्यांत वारला व नातु बाळपणींच नाहींसा झाला यामुळें त्या वृद्धांस किती दुःख झालें असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. म्हातारपणांत इंद्रियें विकल झालीं आहेत, घरांत पेलाभर पाणी द्यायला कोणी नाहीं, यथेच्छ रडल्यावरही प्रेमानें डोळे पुसून समजूत घालायला मायेचें कोणी उरलें नाहीं; अशा विपन्न अवस्थेंत तीं वृद्ध स्त्रीपुरुषें आयुष्याचे दिवस कशी तरी कंठीत होतीं. एकनाथाचा कधीं तरी पत्ता लागेल काय, आमचा बाळ जिवंत तरी असेल काय, त्याच्या पोटापाण्याची कोठें सोय होत असेल काय, असें त्यांनीं येत्याजात्या वाटसरूंस विचारावें व 'मन चिंती तसें वैरी न चिंती' ह्या तत्त्वाप्रमाणें त्याचें कांहीं बरें वाईट झालें असेल अशा शंकेचा नुस्ता वारा जरी चित्तास लागला तरी भूकंपाचा धक्का बसल्यासारखें होऊन त्यांनीं मूर्छित पडावें! शेजाऱ्यापाजाऱ्यांना त्यांची दया येऊन त्यांनीं परोपरीनें त्यांचें सांत्वन करीत असावें. 'भानुदासांची पुण्याई कांहीं आजच संपली नाहीं, असा स्वर्गीय ध्वनिही कधीं

कधीं त्यांच्या हृदयाकाशांत त्यांना ऐकूं येई व त्यामुळें तत्काळ धीर येई. नाथांचे गुण व पोरवयांत कचित् दिसणारी त्यांची निष्ठा आठवून अशा लाडक्या बाळाला हरि विसंबणार नाहीं असेंही त्यांना कधीं कधीं वाटे. ध्रुवप्रऱ्हादादिकांच्या गोष्टी आठवून ' माझ्या नाथालाही सद्गुरूची भेट झाली व तो कृतार्थ होऊन हजारो लोकांच्या जयजयकारांत घरीं परत आला ' अशीं मनोहर सुखस्वप्नेंही त्यांस कधीं कधीं पडावीं ! ह्याप्रमाणें सुखदुःखांच्या लाटांत खाल-वर होणारें त्यांचें जीविततारूं बुडायच्या बेतांत आलें होतें. नाथांचा शोध कुणीकडूनही लागेना. त्यांच्या घरचा पुराणीकही कांहीं आक-स्मिक कारणानें नाथ गेले त्याच वेळेला कोठें निघून गेला होता. तो १०।११ वर्षांनीं पुन्हां पैठणास परत आला, तेव्हां त्याच्या मार्फतीनें चक्रपाणीनें पुन्हां शोध चालविला. ह्या पुराणिकानेंच नाथांस फूस लावून नेले असेल अशी कित्येकांस पूर्वीं शंका आली होती, पण त्यानें खातरजमा करून दिल्यावर त्या शंकेचा निरास झाला. त्या पुराणिकानें नाथांचें बाळपणचें स्वरूप, त्या वेळचे त्यांच्या आवडी-निवडीचे प्रकार, त्यांच्या मनांचा कल इत्यादि आठवून आपल्याच मनाशीं कयास बांधला कीं, हा कोणा तरी सत्पुरुषाच्या आश्रयास गेला असावा. हा विचार मनांत येतांच तो पुराणिक घराबाहेर पडला व शोधाशोधानें तो नेमका देवगडावर जनार्दनस्वामींच्या पायापाशीं येऊन पोंहचला. तेथें आल्यावर त्यांस इत्थंभूत बातमी

कळली व समजलें कीं गुरुकृपा संपादून तो सहा महिन्यापूर्वींच तीर्थयात्रेस गेला आहे ! त्या पुराणिकांस हा शोध लागतांच त्यानें गडावर असलेल्या इतर माणसांकडून नाथांबद्दलची सर्व बारीकसारीक माहिती मिळविली. त्या पुराणिकाचा नाथांवर व चक्रपाणीच्या घराण्यावर फार लोभ होता. त्यानें जनार्दनस्वामींस, चक्रपाणीची अवस्था काय झाली हें कळवळून सांगितलें व 'एकनाथ पैठणास आले म्हणजे त्यांनीं पुन्हां आजाआजींना सोडून दूर जाऊं नये व लग्न करून भानुदासाचा निर्मळ वंश चालवावा' असें आज्ञापत्र देण्याविषयीं चक्रपाणीच्या तर्फें त्यांची प्रार्थना केली. स्वामींनीं भविष्यार्थ मनीं आणून त्याप्रमाणें पत्र दिलें. तें घेऊन तो पुराणिक वायुवेगानें पैठणास गेला व 'नाथ नुसते जिवंतच आहेत असें नाहीं, तर गुरुकृपा संपादून तीर्थाटणास गेले आहेत; व जनार्दनस्वामींनीं त्यांस गृहस्थाश्रम स्वीकारून पैठणासच राहण्याविषयीं स्वहस्तें आज्ञापत्र लिहून दिलें आहे' अशी अत्यंत आनंदाची बातमी त्यांस सांगितली. ती ऐकून त्या वृद्धांस किती आनंद झाला असेल याची कल्पनाच करावी ! नाथांच्या आजीनें तर गडावर जी जी गोष्ट नाथांबद्दल पुराणिकानें ऐकली ती ती पुनःपुन्हां त्यास सांगावयास लावून पुरेसें केलें. ही गोष्ट पैठणभर पसरतांच सर्व लोकांस आनंद होऊन नाथ आतां पैठणास कधीं परत येतात याचीच ते आतुरतेनें वाट पहात बसले. ह्या बातमीनें

आजाआजींच्या कुडींतून गेलेला प्राण परत आला असें म्हटलें तरी चालेल. आतां कांहीं वर्षे जगावें असें त्यांस वाटूं लागलें ! बारा वर्षांच्या कोरड्या दुष्काळानंतर दैवाचा अनुकूल वारा वाहूं लागून आनंदाचा वर्षाव होण्यासारखे शुभवर्तमानाचे ढग पैठण-क्षेत्रावरील आकाशांत एकवटूं लागले !

४ आणि आनंदाचा दिवसही उगवला. पिंपळेश्वराच्या देवळांत नाथ उतरले, व मध्यान्हकाळीं यहच्छेनें जें मिळेल त्यावर निर्वाह करून ते निजसमाधानानें राहूं लागले. त्यांचे तें योगाभ्यासानें वळलेलें तेजःपुंज शरीर, मस्तकावरचा तो दीर्घ जटाकलाप, ती प्रसन्न व आनंदमय मुखकांति, गुरूनें कानीं पेरल्यामुळें डोळ्यांत उगवलेलें तें ब्रह्मतेज, व दर्शनाबरोबर पाहणाऱ्यांच्या मनांत पूज्य-भाव उत्पन्न करणारी ती सहजपणाची मांड पाहून हा कोणी महात्मा आहे असें कांहीं लोकांनीं ताडलें. एके दिवशीं पुराणिकानें नाथांस सहज पाहिलें. ओळख पटली तेव्हां मुकाट्यानें चक्रपाणीस हातीं धरून सायंकाळच्या सुमारास पुराणीक नाथांकडे घेऊन चालले. वाटेंतच नातवाची व आजाची गांठ पडली व पुराणिकानें नाथांस थबकाविलें. झालें, भेट झाली ! चक्रपाणीनें नाथांच्या गळां मिठी मारली व प्रेमावेगानें त्याचें चुंबन घेतलें. दुःखाचा उभड ओस-रल्यावर आनंद व आनंदाचा उमाळा ओसरल्यावर दुःख, ह्याप्रमाणें विरुद्ध भावांच्या तडाक्यांत तो वृद्ध सांपडला ! त्याचे या वेळचें

दुःखही सुखरूपच होतें. ' बापा एकनाथा ! आम्हां वृद्धांना टाकून तूं कसा रे गेलास ? तुझें मृदुचित्त एकाएकी वज्राहून कठोर कसें झालें? तूं आम्हां म्हाताऱ्यांची कांठी. आतांतरी तुला येथून जाऊं देणार नाहीं' ह्याप्रमाणें चक्रपाणीनें आनंदाश्रु ढाळीत शोक केला. नाथांची निजबोधाची बैठक अभंग असल्यामुळें त्यांच्या चित्तास मोहस्पर्श झाला नाहीं. चक्रपाणीनें जनार्दनस्वामींचें पत्र काढून नाथांच्या हातीं दिलें. तें गुर्वक्षर पाहतांच नाथांनीं मस्तकीं धारण करून वाचलें. श्रीगुरूंच्या आज्ञेवरून त्यांनीं त्याच ठिकाणीं मुक्काम केला. ज्या जागेवर पत्र हातीं पडतांना नाथ बसले होतें ती जागा त्यांनीं सोडली नाही ! तीर्थयात्रा तेथेंच पुरी करून गुर्वाज्ञेप्रमाणें त्यांनीं तेथेंच मुक्काम केला. लवकरच त्या जागीं झोंपडी उभारली गेली व पुढें नाथांचा वाडा त्याच जागीं बांधण्यांत आला. तो अद्याप तेथेंच कायम आहे. नाथ पैठणास स्थिर झाले. नातवाची पुन्हां भेट झाल्यामुळें आयुष्यभानु अस्तास जाण्यापूर्वीं आजाआजींस परमसुखाचा लाभ झाला. नाथांचा विवाह करून टाकण्याचा त्यांनीं बेत केला.



# ६ नाथांचा गृहस्थाश्रम.

मजमाजीं रंगली चित्तवृत्ती । यालागी विसरला गृहासक्ती ।।
त्यासी गृहाश्रमीं माझी प्राप्ती । सुखसंपत्ती निजबोधू ॥४३१॥
जरी जाहली स्त्रीपुत्रगृहस्थिती । परी न धरावी त्यांची आसक्ती
सावध राखावी चित्तवृत्ती । परमात्मयुक्तिसाधनें ॥४९३॥

—एकनाथी भागवत अ० १७

१ नाथांचा विवाह. २ नाथांचा नित्यक्रम. ३ नाथांची धर्मपत्नी गिरिजाबाई. ४ गोकुळाष्टमीचा उत्सव, नाथांचीं कीर्तनें व 'भजनीभारुड.' ५ नाथांचीं पुराणें. ६ आचरणाचें तेज. ७ नाथांवरचे आक्षेप व नाथांचें धैर्य. ८ निंदक छलकांविषयीं नाथांची उदारबुद्धि. ९ 'निंदा म्हणजे परमामृत.' १० कर्नाटकी सावकार व विठ्ठलमूर्तीची स्थापना. ११ हरिभक्ताची समता. १२ सगुणनिर्गुणाविचारणा. १३ ठळक गोष्टी.

१ जनार्दनस्वामींनीं गडावर जाण्यापूर्वी चक्रपाणीच्या विनंतीवरून नाथांस विवाह करून गृहस्थाश्रम चालविण्याची आज्ञा केली. 'गृहस्थाश्रम सर्व आश्रमांत उत्तम आहे; सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवून स्वधर्म आणि भूतदया यांचा परिपोष करावा म्हणजे झालें.' ही गुर्वाज्ञा मान्य करून नाथांनीं विवाहास संमति दिली. पैठणच्या आग्नेयेस विजापूर ( वैजापूर ? ) येथील एका संपन्न गृहस्थाची कन्या उपवर झाली होती. त्याच्या कोणी पैठणकर मित्रानें कळ-

विल्यावरून तो आपली मुलगी घेऊन पैठणास चक्रपाणीस दाखविण्यास आला. मुलगी सुलक्षणी, नाकांडोळ्यांनीं रूपस व चतुर पाहून आणि टिपण उत्तम जुळतें हें अजमावून चक्रपाणीनें लग्नाची तयारी केली. विजापूरकर गृहस्थानें भानुदासांच्या पवित्र कुळाचा संबंध होतो हें लक्षांत आणून साळंकृत कन्यादान करण्याचा निश्चय केला. दोन्ही पक्षाचे वऱ्हाडी जमले. विजापुरासच नाथांचा थोडा जवळचा उद्धव नांवाचा एक आप्त होता तोही लग्नास आला. तो फार भाविक व कष्टाळु होता. त्याच्या खटपटीनें व ग्रामस्थांच्या कळवळ्याच्या साह्यानें लग्नसमारंभ उत्तम प्रकारें पार पडला. रुखवत, मधुपर्क, विवाह, सुनमुख, तेलवण, ऐरणीपूजन, घेंडा नाचवणें, गृहप्रवेश, लक्ष्मीपूजन इ० सर्व यथाविधि झालें. वधूचें नांव गिरिजाबाई ठेवलें. एकनाथ व गिरिजाबाई—म्हणजे विवेक आणि शांति—यांचें ऐक्य झालें. नाथांच्या आजाआजींचे डोळे आनंदानें भरून आले. भानुदासाच्या घराण्याची नक्कल होते कीं काय असा संशय उत्पन्न झाला होता तो मावळून त्यांच्या आशांकुराचा जोमदार वृक्ष होण्याचा योग आला. नाथ लग्नापूर्वींच सावध झाले होते. त्यांच्या मस्तकावर ‘ सावधान ’ पणाच्या अक्षता टाकून व ‘ धर्मेचार्थेच कामेच ’ ही शपथ त्यांजकडून घेववून विवाहमंत्रांच्या सफलतेचा दुर्लभ योग मात्र भिक्षुकांनीं साधून घेतला ! गिरिजानाथ गृहस्थाश्रमी झाले.

२नाथांचा **नित्यक्रम** असा असे. ब्राह्ममुहूर्तीं उठून प्रातःस्मरणपूर्वक श्रीगुरुचिंतन करावें, नंतर शौचमार्जनादि विधि आटोपून प्रातःस्नानास गंगेवर जावें, सूर्योदयापूर्वी संध्यावंदनादि सारावें, नंतर घरीं येऊन पूजाअर्चा, ध्यानधारणा इत्यादि करून गीताभागवतादि ग्रंथांचें पारायण अगर श्रवण करावें. इतकें होतां होतां मध्यान्हकाळ येई. मध्यान्हसंध्या व ब्रह्मयज्ञ गंगेवर सारून, घरीं नैवेद्यवैश्वदेव आटोपून व अतीतअभ्यागतांचा समाचार घेऊन सर्वांसह भोजनास जावें. भोजनोत्तर विद्वान् व भाविक ब्राह्मणांबरोबर त्यांनीं आत्मचर्चा करावी; तिसरें प्रहरीं भागवत, रामायण किंवा ज्ञानेश्वरी यापैकीं एखाद्या ग्रंथावर भानुदासांनीं स्थापिलेल्या श्रीविठ्ठलमूर्तीपुढें पुराण सांगावें. सायंकाळीं पुन्हा गंगेवर जाऊन संध्याविधि आटोपून घरीं परत यावें व रात्रीची धुपारती, स्तोत्रें वगैरे सारून थोडा फराळ करावा. यानंतर कीर्तन करावें किंवा वेदोपनिषत्पुराणें मननपूर्वक वाचण्यांत मध्यरात्रीपर्यंत काळ घालावा. नाथांना रोज चार तास झोंप पुरत असे. युक्ताहारविहार तर त्यांचा नित्याचाच होता. पुराण, कीर्तन, भजननामोच्चारादि सुरू करण्यांत त्यांचा हेतु जनांस भक्तिमार्गाला लावण्याचाच होता. आत्मानुसंधान सुटूं न देतां सर्व कर्मे भगवंताला अर्पण करून प्रपंचांत ते अलिप्तपणानें राहत. आत्मानुसंधान, हरिचिंतन, गुरुस्मरण, नामस्मरण हे शब्द दिसायला मात्र वेगळे आहेत, पण त्यांचें स्वरूप एकच आहे.

अभेदभक्तीचें स्वरूप त्यांच्या आचरणांत स्पष्ट उमटलें होतें. देवाहून वेगळेपणानें न राहतां सर्वभूतीं हरीला पाहून सर्व संसारच त्यांनीं ब्रह्मरूप करून टाकला! नाथांच्या घरीं सदावर्त होतें. अन्नदान सर्वांस होत असें. नाथ ब्राह्मणपूजनीं तर विशेषच दक्ष असत. रात्रीं त्यांच्या घरचा टाळमृदंगांचा ध्वनि ऐकून सारें गांव कीर्तनाला गोळा होई. महारमांगादि जातींना सुद्धां बसण्याची वेगळी सोय केलेली असे. "न करी कोणाचें उपार्जन। दृष्टीस न येती थोर सान। चराचर जें जें दिसे आन। तें तें जनार्दन भासत" (भक्तिविजय अ० ४५-१४०) अशा समदृष्टीनें ते सर्वांसी वागत. गृहप्रपंचाची व्यवस्था उद्धव मोठ्या आवडीनें पाहत असल्यामुळें नाथांस तिकडे बिलकूल पहावें लागत नसे. आहे नाहीं ही सर्व चिंता तो वाही. तो सच्छिष्य होऊन नाथांच्या केवळ कृपेची अपेक्षा धरून त्यांजजवळच राहिला होता.

२ नाथांच्या प्रपंचाला भार्याहि फार उत्तम मिळाली वय लहान असतांनाच तिनें सारा प्रपंच आवारिला. चक्रपाणी व त्यांची भार्या विद्यमान होती तोंपर्यंत 'प्रीति व्हावया पतिमानसीं। कुळवधु मानी सासुसासऱ्यांसी' ह्या नाथोक्तीप्रमाणें अगदीं त्यांच्या मर्जीनें वागून त्यांचें प्रेम तिनें संपादन केलें. नाथांचें लग्न झाल्यावर कांहीं वर्षांनीं त्यांची आजी वारली व पुढें थोड्याच दिवसांनीं चक्रपाणिही निवर्तले. यानंतर सारा संसार गिरिजाबाईच्या अंगा-

वर पडला. नाथांप्रमाणेंच गिरिजाबाई सुशील, शांत व दयाशील होत्या. महद्भाग्यानें नाथांसारखा पति मिळाल्याबद्दल तिला धन्यता वाटे. अनुकूल, कुलज, कुशल व सुशील अशी भार्या नाथांनाही महत्पुण्यानें मिळाली. परोपकारांत व आबालवृद्धांसी समप्रेमानें वागण्यांत ती नाथांहून कांकणभरही कमी नसे. ती कष्टाळु माउली दीनअनाथांच्या आशीर्वादांस पात्र होऊन राहिली होती. दाराशीं आलेला अतिथि विन्मुख न जावा अशी जी नाथांची इच्छा तीच गृहिणीरूपानें त्यांच्या घरीं प्रत्यक्ष नांदत होती! रात्रींअपरात्रीं चूल पेटवून क्षुधितांस जेऊं घालण्याचा तिनें केव्हांही कंटाळा केला नाहीं. नाथांच्या घरीं अन्नवस्त्राला तोटा नव्हता. हरीनें अन्नवस्त्राला उणें पाडलें नाहीं, हें जितकें नाथांच्या तितकेंच गिरिजाबाईच्या पुण्याईचें फळ होय. संसार संभाळून हरिचिंतनांत तीही नाथांप्रमाणेंच सर्वकाळ निमग्न असे. नाथांचा प्रपंच-परमार्थ एकरूप होण्यास गिरिजाबाईचें मोठें साह्य झालें. त्यांनीं म्हटलें आहेः–" स्त्रीपुरुषांची चित्रवृत्ति। अनुकूल वर्ते धर्मप्रवृत्तीं। तरीच परलोक साधिती। इतरां प्राप्ति ते नाहीं" (नाथभागवत अ० ७–६१२). पति व पत्नी ह्या दोघांच्याही चित्तवृत्ति धर्मानुकूल असतील तरच प्रपंचांत परमार्थ साधतो, ही नाथांची उक्ति स्वानुभवाचीच आहे. प्रपंचाचा अंतरंग गिरिजाबाईनें व बहिरंग उद्धवानें सांभाळला असल्यामुळें नाथांना प्रपंचाकडे पहावें लागलें.

नाहीं, व त्यांनींही नाथांच्या सेवेंत सदा दक्ष राहून आपला परमार्थ साधला. 'अतिथि आणि पतिपुत्रांसीं । भोजनीं समता नित्य जिसीं । धनलोभ नाहीं मानसीं । परमार्थी तिसी अधिकारु' (नाथभागवत अ० २९–५८४) ह्या नाथांच्या वचनाप्रमाणें गिरिजाबाई परमार्थाची अधिकारी होऊन नाथसंगतीनें सद्गति पावली. नाथांचा संसार सुखाचा होण्यास गिरिजाबाईचे सद्गुण कारण झाले. पतिपत्नी इतक्या एकचित्तानें वागल्याचा दाखला क्वचित् सांपडेल. कांहीं साधु प्रपंचांत न पडतां मोकळेच राहिले; कांहींनीं विवाह करून प्रपंच केला पण त्यांच्या प्रपंचाची फटफजीती झाली, नाथांचा मात्र प्रपंच सर्वोत्कृष्ट झाला. भगवद्भजन व अन्नदान यामुळें नाथांच्या वाड्याला मंदिराची शोभा येत असे, त्यांत असा लक्ष्मीनारायणाचा जोडा एकचितानें, उदारप्रेमानें व प्रपंचपरमार्थ एक करून आनंदानें नांदत असलेला पाहून भाविकांस अपार सुख होई. मान्य पुरुषरत्नांत अग्रेसर असा नाथांसारखा पुरुष व सत्क्रियेची प्रत्यक्ष मूर्ति अशी गिरजाबाईसारखी स्त्री–अशा तुल्यगुण वधुवरांना एकत्र आणून ब्रह्मदेव क्वचित्काळीं मिळणाऱ्या धन्यवादास पात्र झाला! कलियुगांत नाथांसारखा प्रपंच नाथांचाच झाला.

४ नाथ पैठणास आले ते गुरुपत्रिका त्यांच्या हातीं ज्या जागीं पडली त्याच जागीं राहिले. प्रथम त्यांनीं तेथें एक झोंपडी बांधली, व झोंपडीचा नंतर वाडा झाला. पैठणास आल्यापासून त्यांचा

काळ भजनपूजनांत व परोपकारांत जाऊं लागला. वैराग्य, समचित्तता, शांति व परोपकार यांत देह झिजवण्याची आवड हे त्यांचे गुण लोकांच्या प्रचीतीस जसजसे येत चालले, तसतसा त्यांच्याविषयीं लोकांचा आदर वाढत चालला. त्यांनीं प्रथम एकादशीस स्वयं-स्फूर्तीनें कीर्तन केलें, तें ऐकून लोकांचें त्यांजवर प्रेम बसलें. पुढें गोकुळाष्टमी आली तेव्हां नाथांनीं टोलेजंग उत्सव केला, तो त्यांच्या हयातीभर चालून पैठणास अजून तसाच चालत आहे. गोकुळाष्टमीचा उत्सव त्यांनीं सुरू केला तेव्हां ते प्रासादिक वाणीनें तेथल्या तेथें अभंग रचून ह्मणूं लागले. कीर्तनास अठरापगड जातींचे लोक जमत होते. कोणांसही 'मज्जाव' नव्हता. श्रवणानें सर्वांचें मन वेधून गेलें. ह्या पहिल्या उत्सवाचा विशेष हा होता कीं, त्यासाठीं नाथांनीं देव-गडाहून जनार्दनस्वामींस मुद्दाम आणविलें होतें! गुरुशिष्यांची तीर्थयात्रेनंतरची हीच पहिली भेट! उत्सवासाठी पुष्कळ सामुग्री स्वामींनीं गडावरून बरोबर आणली होती. उत्सवासाठीं मोठा मंडप उभारण्यांत आला होता. चवदा दिवस उत्सव चालला असून अन्न-दान सतत चालूं होतें. नाथांनीं गुरूंचा सत्कार अपूर्व केला. जनार्दनस्वामी समोर आसनावर बसले आहेत, पैठणस्थ विद्वान् व इतर लोक प्रेमानें श्रवण करित आहेत, वृद्ध आजाआजीही आपल्या नातवाचा गौरव पाहण्यास हजर आहेत, अशा थाटांत नाथांनीं कीर्तनाचा गजर चालविला. नाथांचें वक्तृत्व, विषयप्रतिपादनाची

मनोहर शैली, ज्ञानवैराग्याचा निर्मळ बोध होईल अशी मांडणी व भक्तिप्रेमाचा सागर उचंबळेल अशा तऱ्हेचें कळकळीचें देवाला आळवणें, यामुळें श्रोत्यांना ती परमानंदाची मेजवानीच झाली असें वाटलें. गुरुसन्मुख कीर्तन करण्याचा सुयोग आल्यामुळें शिष्याला प्रेमाचें भरतें आलें नाथांच्या कीर्तनाला उत्तरोत्तर रंग चढूं लागला तो इतका कीं पंढरपूरच्या एका बडव्याला विठोबानें स्वप्नांत दृष्टांत देऊन 'मी अलीकडे पैठणास नाथांच्या कीर्तनांत मागें ध्रुपद धरून उभा असतो' असें सांगितलें! नाथांनीं कीर्तनाची मर्यादा एका बहारीच्या पदांत घालून दिली आहे. तें पद असें:—

पद.

सगुण चारित्रें परम पवित्रें हरिचीं वर्णावीं।
सज्जनवृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥ १ ॥
संतसंगें अंतररंगें नाम बोलावें ।
कीर्तनरंगीं देवासन्निध सुखें डोलावें ॥ २ ॥
भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या।
प्रेमभरें बा! वैराग्याच्या युक्ती विवराव्या ॥ ३ ॥
जेणेंकरुनी मूर्ति ठसावे अंतरिं श्रीहरिची ।
ऐसी कीर्तनमर्यादा हे संतांचे घरची ॥ ४ ॥
अद्वयभजनें अखंडस्मरणें वाजवि करटाळी ।
एकाजनार्दनीं मुक्ती होय तात्काळीं ॥ ५ ॥

सगुणप्रेमा वाढून सगुणनिर्गुण एक ही भावना उत्पन्न व्हावी अशी नाथांच्या कीर्तनाची मांड असे. 'आंतरशुद्धीचें कारण। मुख्यत्वें हरिकीर्तन' हें त्यांचें नेहमींचें सांगणें.

कीर्तनें स्वधर्म वाढे। कीर्तनें स्वधर्म जोडे।
कीर्तनें परब्रह्म आंतुडे। मुक्ति कीर्तनापुढें लाजोनि जाय ४१८
भावें करितां हरिकीर्तन। तेणें संतोषे जनार्दन।
उभयतां पडे आलिंगन। मिठी परतोन सुटेना ॥ ४३५॥
तेव्हां सबाह्याभ्यंतरीं। देव प्रगटे चराचरीं।
दुजें देखावया संसारीं। सर्वथा उरी उरेना ॥ ४३६॥
एवं योगयागादि तपसाधनें। पोरटीं केलीं हरिकीर्तनें।
कलियुगीं नामस्मरणें। जड उद्धरणें कीर्तनीं ॥ ४४०॥

—नाथभागवत अ० ५

कीर्तन व नामस्मरण यांवर नाथांचे शेंकडो अभंग आहेत त्या सर्वांचा हाच सारांश आहे. पंक्तिप्रपंच न करितां व जातवित्त-कुलगोत्र यांचाही विचार न करितां सर्वांस सारखें अन्नदान नाथांच्या घरीं होत असे. रात्रीं बाळक्रीडा वर्णून गोपाळकाला होई. कीर्त-नाच्या शेवटीं ललित करण्याचा प्रघात सुरू करून नाथांनीं सालोसाल झोंबी, हमामा, हुंबरी, चेंडू, फुगडी, पिंगा, सर्प, विंचू, पांगुळ, पिंगळा, जोहार, मानभाव, बालसंतोष, वासुदेव, गांवगुंड, अर्जदास्त, अभयपत्र, हुतुतु, भोंवरा, विटीदांडू, जातें, जोशी,

पांखरूं, कोल्हाटीण, डुगडुग्या, मांग, कुंटीण, कंजारीण इत्यादि विचित्र प्रसंगांवर जें मनोहर कवित्व केलें आहे तें 'नाथांचें भजनी-भारूड' या नांवानें प्रसिद्ध आहे. लोकांच्या बोलत्या भाषेंत व चालत्या व्यवहारांत त्यांना रुचेल व पचेल अशा सुलभ पद्धतीनें हरिभक्तीचा प्रेमा वाढविण्याचा नाथांचा हा उत्तम मार्ग पाहून त्यांच्या उदारपणाची धन्यता वाटतें. 'कोणत्याही धर्माचा, पेशाचा व जातीचा कोणीही पुरुष अगर स्त्री तुच्छ न मानतां प्रत्येकास त्याच्या त्याच्या भूमिकेवर येऊन ब्रह्मज्ञानोपदेश करण्याचा नाथांचा उदार मार्ग पाहिला ह्मणजे त्या परम भागवत्तोतमाची धर्मप्रवर्तकांमध्यें प्रमुखपणानें गणना कां झाली आहे हें लक्षांत येतें. हरिभक्तीचा मार्गच असा आहे कीं, त्यांत जो आस्थेवाईक आहे तोच अधिकारी आहे. हरीच पाहिजे असें ज्याला अंतरापासून वाटतें तोच परमार्थाचा अधिकारी आहे, मग त्याची जात, वर्ण, पेशा, भाषा, धंदा कोणताही असो. "हो कां वर्णांमाजी अग्रगणी। जो विमुख हरिचरणीं। त्याहुनि श्वपच

---

* स्वामी विवेकानंदानीं धर्मप्रवर्तकाचें लक्षण येणेंप्रमाणें केलें आहेः—

"The only true Teacher is he who can convert himself as it were into a thonsand persons at a moment's notice. The only true Teacher is he who can immediately come down to the level of the student, and transfer his soul to the student's soul, and see through the student's eyes and hear through his ears and understand through his mind! Such a Teacher and none else-can teach."

श्रेष्ठ मानी। जो भगवद्भजनीं प्रेमळ " (नाथभागवत अ० ५–६० ). असो. याप्रमाणें नाथांनीं गोकुळाष्टमीचा उत्सव सुरूं करून त्या निमित्तानें भागवतधर्माची ध्वजाच फडकाविली.

५. उद्धवाची भागवतश्रवणाची आस्था पाहून नाथांनीं भागवतावर पुराण सांगण्यास प्रारंभ केला. नाथांचें निरूपण स्वानुभवपूर्ण व प्रेमळ असल्यामुळें श्रोत्यांच्या झुंडी रोज परमानंद-सुखानें डोलूं लागल्या. भाविक स्त्रीपुरुषांना त्यापुढें कामधाम सुचेनासें झालें. केशवानें ( अ. ११ ) ह्मटलें आहे:—

भक्तिज्ञानवैराग्ययुक्त । व्याख्यानीं रस अद्भुत ।
नित्य नूतन गोडी उपजत । प्रेम वोसंडत श्रवणार्थिया ॥ २४॥
लांचावलें सुखें चित्त । नित्य आनंद भोगीत ।
उत्कर्ष वाढला भक्तिपंथ । नामगजर होत घरोघरीं ॥ २५ ॥

कित्येक श्रोते तर रोज नाथांच्या पंक्तीचें भोजन झोडून पुराण-कीर्तनांत तल्लीन होऊन राहिले होते ! नाथांच्या घरीं नित्य नवे लोक येत, पण हा संसाराचा गाडा कसा चालेल याची त्यांनीं काळजी केली नाहीं. ' हा मी व हा माझा संसार ' असें त्यांच्या मनांतच कधीं आलें नाहीं. सर्व संसार हरीचा व त्याचा तो चालवून घेत आहे अशा निरहंकारपणानें ते वागत. संसार देवा-पायीं वाहून भक्त मोकळे राहतात व मग तो संसार देवाचा होतो.

६. सर्व दानांत श्रेष्ठ अन्नदान व त्याहूनही श्रेष्ठ स्वस्वरूपदान. नाथांनीं दोन्हीं दानें सढळ हातानें जन्मभर केलीं व भगवान् त्यांच्या घरीं नांदत असल्यामुळें त्यांना कधींच कमी पडलें नाहीं. नाथांच्या पुराणकीर्तनांचा जो लोकांवर परिणाम व्हावयाचा तो झालाच, पण त्याहून उत्तम परिणाम त्यांच्या सदाचाराचा झाला. शेंकडो व्याख्यानपुराणांनीं जें काम होत नाहीं तें काम सत्पुरुषाच्या आचरणानें होतें. ऐकून वळत नाहीं इतका मनुष्य पाहून वळतो ! क्षमा, शांति, भूतदया, निरहंकार, निःसंगता, हरिभक्ति, परोपकार, व इंद्रियदमन हे गुण ज्याच्या अंगीं पूर्णपणें बाणले आहेत व ज्याच्या प्रत्यहीं आचरणांत व्यक्त होत आहेत असा क्रियावंत एक पुरुष पाहून लोक जितके शुद्धीवर येतात तितके नुसत्या व्याख्यान-कीर्तन–पुराणादिकांनीं येत नाहींत ! नाथांनीं ग्रंथ लिहिले व कथा-कीर्तनें केलीं म्हणून त्यांची समाजावर जितकी छाप बसली तिच्या-हून सहस्रपट त्यांच्या आचरणानें बसली. आचरून दाखवितात तेच संत. संत पूर्णकामच असतात, पण बद्धांना मुमुक्षु व मुमुक्षूंना मुक्त करावें याचसाठीं त्यांचें जीवित असतें. ज्ञानेश्वर-महाराजांनीं (ज्ञाने० अ. १६) म्हटल्याप्रमाणें:—

कां फेडीत पापताप । पोखीत तीरींचे पादप ।
समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥ १९९ ॥

कां जगाचें आंध्य फेडीत । श्रियेचीं राउळें उघडीत ।
निघे जैसा भास्वत । प्रदक्षिणे ॥ २०० ॥
तैसीं बांधलीं सोडीत । बुडालीं काढीत ।
सांकडीं फेडीत । आर्तांचिया ॥ २०१ ॥
किंबहुना दिवसराती । पुढिलांचें सुख उन्नति ।
आणीत आणीत स्वार्थी । प्रवेशिजे ॥ २०२ ॥

गंगा सागराला मिळायला जाते पण जातां जातां जगाचें पाप-ताप निवारीत व तीरीचे वृक्ष पोशीत असते किंवा सूर्य रोजची प्रदक्षिणा करितां करितां जगांतील ताप नाहींसें करित व कमळें विकसवीत जातो; त्याप्रमाणें स्वस्वरूपीं मिळून जाणारे संत आपल्या सहजक्रियांनीं जीवांना बंधमुक्त करित, संसारमग्नांना उद्धरीत व आर्तांचीं दुःखें निवारीत असतात ! हें कांहीं आपण महत्कृत्य करित आहों याचीं त्यांना खबरही नसते, तथापि त्यांचें आचरण पाहून हजारो लोक आपापल्या उद्धाराचा मार्ग शोधूं लागतात. संतांची रहाणी हीच जगाला आरशासारखी होते. त्यांच्या सदाचाराचा कित्ता लोक गिरवूं लागतात. असो नाथांचें सदाचरण व निष्काम भगवद्भजन हें पाहून हजारो जीव उद्धरून गेले.

७ नाथांच्या कीर्तनपुराणांचा लोकांच्या मनावर उत्तम परिणाम होऊन पैठणास परमार्थचर्चा व नामस्मरण यांत लोक इतके गढून गेले कीं, सकाम व्रतादिकांकडे त्यांचें दुर्लक्ष होऊन कित्येकांच्या पोटा-

वर पाय आले ! खऱ्याच्या तेजापुढें खोटें फिकें पडतें व अस्सला-पुढें नक्कल हिणकस ठरते, त्याप्रमाणें आंतबाहेर एकरूप अशा ह्या महाभागवतापुढें पैठणचे वैदिक, पंडित, भिक्षुक व सर्व विद्वान् निस्तेज झाले व त्यापैकीं बरेच त्यांचा द्वेष करूं लागले. द्वेषाचा परिमाण निंदेंत व निंदेचा छलांत होऊन नाथांसारख्या महात्म्याचा छळ करण्यास बद्धपरिकर होऊन ते पुढे सरसावले. हा देववाणीचा उपमर्द करून प्राकृतांत ग्रंथ करितो, कर्मठपणाचा उच्छेद करून लोक नामस्मरणानेंच गुंग करून वेडे करितो, सकामव्रतादिकांचा उपहास करून निष्काम प्रेमाचेंच स्तोम माजवितो, ह्याच्यामुळें वेदशास्त्रांपेक्षा भक्तिमार्गाचेंच बंड माजत चाललें आहे, याच्या उपदेशानें ‘प्रपंचरीती सांडिली बहुतीं। विचरती आत्मस्थिती। आमुच्या गोष्टी न मानिती। लोकीं प्रवृत्ति बुडाली’ असा प्रकार झाला आहे, हा श्रोत्रिय ब्राह्मणांप्रमाणें इतर हीन वर्णांना व अंत्यजांनाही जवळ करितो व त्यामुळें ब्राह्मणांची शोभा राहत नाहीं, हा ब्रह्मज्ञान चव्हाट्यावर सर्वांस सारखें देत असल्यामुळें माळामुद्रांचें व कान फुंकणाऱ्या गुरूंचें महत्व कमी होतें, इत्यादि अनेक प्रकारचे आक्षेप नाथांवर ह्या लोकांनीं केलें व त्यांच्या उपहासछलास प्रारंभ झाला!! नाथ कोणाचें मन दुखवीत नसत, ब्राह्मणांचा योग्य सत्कार करून वेदशास्त्रपुराणांचा उत्तम बोज राखीत, तथापि अंतःशुद्धि हें भगवत्प्राप्तीचें मुख्य

साधन असून 'अंतर्बहिश्च तत्सर्वं व्याप्य नारायणःस्थितः' हें हरीचें शुद्ध स्वरूप आपल्या हृदयांतच ओळखा व कळकळून हरीला हाका मारा कीं तो तुमच्यापाशींच आहे असें ते सांगत. हें खरें ज्ञान ज्यांच्या जीविकेच्या आड येत असे ते त्यांचा द्वेष करूं लागले. नाथ निर्भयपणानें दंभ व दांभिक यांवर प्रहार करीत. खोट्याची त्यांनीं भीड धरिली नाहीं व खरें सांगायला ते भ्यायले नाहींत. त्यांचे 'बाह्य वेषधाऱ्यास उपदेशपर अभंग' आहेत ते पाहिले म्हणजे दंभस्फोट करण्याचें काम त्यांनीं किती चोख केलें आहे तें समजेल. परमार्थाला अंतःसाधन हेंच मुख्य साधन आहे असें ते सांगत असल्यामुळें बहिःसाधनांचीं दुकानें मांडून बसणारे धनलोभी त्यांजवर संतापले.

८ खोट्यावर व्यापार करणारे पोटबाबू नेहमींच खऱ्याचें प्रतिपादन करणाऱ्यांचा द्वेष करायचे. नाथ ब्राह्मण व खरे ब्राह्मणभक्त, पण दुराचारी, ढोंगी, लुच्चे, नास्तिक असे जे कित्येक ब्राह्मण होते त्यांचा त्यांनीं कैवार घेतला नाहीं. सदाचार व हरिभक्ति यांना नाथांच्या दरबारीं मान असे. हरिभक्त महाराला ते नास्तिक व दुराचारी ब्राह्मणांपेक्षां अनंतपटीनें श्रेष्ठ मानीत. नाथ संकरप्रिय नव्हते, तथापि 'जन्मकर्म वर्णाश्रमजाती । पूर्ण भक्त हातीं न धरिती । चहूं देहांची अहंकृती । स्वप्नींही न धरिती हरिभक्त' हा त्यांचा न्याय आहे. ब्राह्मण म्हणूनच ब्राह्मणाला कवटाळणारे

किंवा महार ह्मणूनच महाराला जवळ करणारे ते नव्हते. देह-भावाला गिळून बसणारे जे उच्च कोटींचे माहात्म्ये आहेत त्यांची ब्राह्मण व चांडाल यांच्याविषयीं समदृष्टी असते, तशी नाथांची होती. नाथांवर जे आक्षेप आले व त्यांचा जो छळ झाला त्याच्या अनेक मनोरम कथा प्रसिद्ध आहेत. नाथांनीं आपल्याविषयीं लोक काय तर्क काढतात हें स्वतः भागवतांत ( अ० १ ) एके ठिकाणीं मोठ्या मजेनें सांगितलें आहे:——

एका जनार्दनाचा वृत्तांत। एक ह्मणती भक्तियुक्त।
एक ह्मणती जीवन्मुक्त। प्रपंची निश्चित मानिती एक ५०६
"अहो! हा एका जनार्दन। नाहीं आसन, न देखे ध्यान,।
नेम मुद्रा माळा जाण। उपासनलक्षण या नाहीं! ॥ ५०७॥
कोण मंत्र असे यासी?। काय उपदेशी शिष्यांशीं?॥
मंत्र न दे कोणासी। भुललीं भाविकें त्यासी या भावार्थें ॥५०८॥
नुसत्या हरिनामाचा घोष। लावूनि भुलविले येणें लोक" ॥
ऐसे नाना विकल्प। जनार्दन देख उपजवी स्वयें ॥ ५०९॥

नाथांची सोशिकता, क्षमाशीलता किंवा समता अलौकिक असल्यामुळें निंदक व छळक त्यांचें कांहीं एक वांकडें करूं शकले नाहींत. अपकाऱ्यांवरही उपकार करणाऱ्या महात्म्याचें छलक तरी काय वांकडें करणार? छलक किंवा निंदकही नाथांनीं तुच्छ केले नाहींत, तर त्यांचे वाग्बाण शांतपणानें सोसून उलट त्यांच्या पार-

लौकिक कल्याणाची यांनीं काळजी वाहिली. त्यांना वेळोवेळीं दिलेलीं प्रायश्चित्तें त्यांनीं समाधानानें घेतलीं. निंदकाची उलट निंदा न करितां त्याला गुरुत्व देऊन म्ह. गौरवून त्याचें आत्यंतिक क्षेम साधून देण्याविषयींच झटायचें ही त्यांची रीत होती. ते पुढें ह्मणतात:—

शिष्याचे क्षोभ न साहवती । निंदकांचीं निंदा न जिरे चित्तीं ॥
तैं तो कोरडाचि परमार्थी । क्षोभें निश्चितीं नागवला ॥ ५२१ ॥
एवं पराचे प्रकृतिगुण । पाहतां सर्वथा क्षोभे मन ।
ते न पहावे आपण । सर्वभूतीं चैतन्य समत्वें पहावें ॥ ५२२ ॥
येणेंचि निर्धारें गुरु तो गुरु । आम्हां शिष्य तोही संवादगुरु ।
निंदक तो परमगुरु । निरपराध सद्गुरु जनार्दनकृपा ॥ ५२४ ॥

लोकांच्या प्रकृतिधर्मांकडे न पाहतां चिद्रूपाकडे पाहणें ही संतांची रीतच आहे. नाथांनीं आणखी एके ठिकाणीं (अ. ११) म्हटलें आहे:—

साधु असाधु पाहतां जनीं । तो ब्रह्मरूप देखे दोनी ।
देखते देखे तद्रूपपणीं । निजात्मदर्शनीं निजबोधू ॥ ४७१ ॥
तेथ कोणाची करावी निंदा । कोणाच्या करावे गुणानुवादा ।
मीचि विश्व हें आलें बोधा । स्तुतिनिंदा निमाली ॥ ४७२ ॥

या संबंधानें नाथांचें पुढील बहारीचें पद पहा:—

## पद

निंदक कामाचा कामाचा । गडी आत्मारामाचा ॥ ध्रु० ॥
निंदक आमुची काशी । आमुचीं पातकें अवघें नाशी ॥१॥
निंदक आमुची गंगा । आमुचीं पातकें नेते भंगा ॥ २ ॥
निंदक आमुचा सखा । आमुचीं वस्त्रें धुतो फुका ॥ ३ ॥
निंदक आमुचा गुरु । **एका जनार्दनीं** थोरू ॥४॥

इतक्या विशुद्धभावनेनें निंदकछलकांशीं वागून नाथांनीं आपल्या शांतिक्षमादयादि गुणांनीं त्यानांच मार्गावर आणण्यास झटावें! नाथांची अक्षोभ्यता, समता व शांति केवल अनुपम होत !

९ निंदकछलकांचा त्रास प्रत्येक थोर पुरुषाला सोसावा लागतो. प्रत्येक थोर व्यक्तीला आपल्या थोरपणाबद्दल निंदारूपी कर जगाला द्यावा लागतो. निंदेच्या कसावर जे टिकतात तेच थोरपणा पावतात. सत्यअसत्याला मन ग्वाही करून संत वागत असतात. मनुष्य स्वभावतः आत्मस्तुतिप्रिय आहे, त्यामुळें निंदेचे बाण त्याला सहन होत नाहींत. पण संत असे कोंवळ्या कातडीचे हरिण नसतात, ते वाघ असतात दुसऱ्याची निंदा स्वतः करावयाची नाहीं व दुसऱ्यांनीं केलेली निंदा मोठ्या मनानें सोसायची असे मेरुतुल्य धैर्याचे जे पुरुष तेच थोरपणा पावतात. निंदकालाही आवडून घेण्याइतका गोडपणा त्यांच्या ठिकाणीं असतो. ईश्वरानें आपल्याला जें काम लावून दिलें आहे त्या कामांत ते इतके व्यापृत असतात कीं,

त्यांना दुसऱ्याच्या कामाची उठाठेव करण्यास वेळच सांपडत नाहीं व जे त्यांच्या दोषांबद्दल त्यांना जागवितात त्यांना ते आपले मित्र, हितकर्ते व गुरु म्हणून अवडून घेतात. नाथांनीं भावार्थरामायणांत (अ० १) म्हटलें आहे:—

कथा निंदिती वंदिती जनीं । ते माउली माझे दोनी ।
तो निंदक सखी जननी । मजलागूनी कृपाळु ॥ २१ ॥
जैसे जननीचे करतळ । वारिवारि क्षाळिती बाह्यमळ ।
निंदक सबाह्य काळिमळ । करी निर्मळ निजवदनें ॥ २२ ॥
यालागीं निंदकचि तत्वता । साह्य सखा परमार्था ।
त्या निंदकातें निंदितां । दोषी सर्वथा स्वयें होय ॥ २३ ॥
निंदा म्हणजे परमामृत । निंदा निर्द्वंद्व सुखस्वार्थ ॥
निंदक न पाहे निजस्वार्थ । अतिसमर्थ परोपकारी ॥ २४ ॥
जेथें निंदा सुखरूप समाये । त्याचे मस्तकीं वंदूं पाये ॥
धन्य धन्य त्याची माये । जो निंदा साहे निर्द्वंद्व ॥ २५ ॥

ह्या उत्कृष्ट ओंव्यांत नाथांनीं केवढें उदारपण व्यक्त केलें आहे. नाथांच्या मागें निंदकछलकांचा ससेमिरा जन्मभर लागला होता. गृहस्थाश्रमाचा स्वीकार केल्यापासून गोदातीरीं देह ठेवीपर्यंत त्यांनीं आपलें आयुष्य जसें परोपकारांत वेंचलें, तशी निंदकांनींही त्यांची सारखी पाठ पुरविली होती; पण नाथांच्या समदृष्टीला निंदकही गुरुरूपच दिसले!

१० कर्नाटकांत एका मातबर सावकारानें विठ्ठलरुक्मिणीच्या सुंदर मूर्ति तयार केल्या व त्यांची तो स्थापना करणार तों त्यांस ओळीनें तीन दिवस दृष्टांत झाला 'कीं ह्या मूर्ति पैठणास श्रीएकना-थनामक सत्पुरुष आहेत त्यांच्याकडे नेऊन दे.' त्यावरून मोठ्या लव्याजम्यानिशी तो सावकार पैठणास आला. गावांत शिरतांच क्षेत्रस्थ भिक्षुक आपापल्या वह्या घेऊन त्याजकडे धांवले, पण त्यांनीं नाथांच्या वाड्याशिवाय अन्यत्र न उतरण्याचा निश्चय केल्याप्रमाणें तो नाथांकडेच आला. नाथांनीं त्याच्या आगमनाचें कारण ताडलें. त्याचा सत्कार रीतीप्रमाणें झाल्यावर त्यानें आपल्या येण्याचें कारण सांगितलें व नाथांनीं ठरविल्याप्रमाणें शुभमुहूर्तावर मोठ्या समारंभानें विठ्ठलरुक्मिणींचें विधिपूर्वक लग्न लावून देवांची प्राणप्रतिष्ठा केली व ब्राह्मणभोजन दानधर्म इत्यादि मोठ्या आवडीनें करून त्यानें आपली विठ्ठलभक्ति व्यक्त केली. कांहीं दिवस नाथांचीं कीर्तनें–पुराणें ऐकून तो परम समाधान पावला व नाथांचा उपदेश घेऊन तो परत आपल्या गावीं नाथांचे गुण गात गेला. स्थापन झालेल्या विठ्ठलमूर्तींची पूजाअर्चा नाथांनीं मोठ्या भक्तिभावानें चालविली. मंदिर बांधण्यासकट सर्व खर्च त्या कर्नाटकी सावकारानेंच केला होता.

११ नाथांचें कर्माचरण त्यांच्या ब्रह्मनिष्ठेला शोभण्यासारखें होतें. कठोर कर्मठपणा व बाष्कळ कर्महीनता हे दोन्ही कोण

वर्जे करून 'जेणें तुटे माझें अनुसंधान । तें कर्म त्यागावें आपण । जेणें स्वरूपनिष्ठ होय मन । तें समाधान राखावें' (नाथभागवत अ० २७-३५१ ) ह्या तत्वानुसार त्यांचें वर्तन होतें. अनाचार व अत्याचार ह्या दोन टोंकांच्या मधला जो सदाचार त्याचाच संतसज्जन स्वीकार करितात ! वर्णसंकरही नसावा व वर्णाभिमानही नसावा अशा समतेच्या तोलांत संतानांच वागतां येतें. कर्म, ज्ञान, योग, याग, जप, तप, वेदाध्ययन, वर्णाश्रम ह्यापैकीं एकेकाचा वृथाभिमान घेऊन शब्दपंडित भांडत बसतात; पण संत ह्या सर्व प्रकारांनीं जें साध्य त्याच्याचकडे मुख्यतः लक्ष्य ठेवून वागतात. हरि हेंच सर्व साधनांचें साध्य आहे व हरीला सर्वभूतीं पाहून सर्वभूतीं अखंड ब्रह्मबुद्धि ठेवणें व त्यांच्या हितार्थ झटणें म्हणजेच परोपकारांत नित्य तनुमन-प्राण झिजवणें हीच हरिभक्ति होय. समदृष्टीनें, निरपेक्षपणानें, निरहंकारानें सर्वाभूतीं भगवंत भरला आहे अशा बुद्धीनें जो परोपकार घडतो तेंच उत्तम हरिभजन होय ! भूतें भगवद्रूपानें पाहून त्यांच्या हितार्थ कायावाचामनानें 'मी' विसरून जें झटणें तेंच हरीचें सेवन होय. अशा परोपकारांत नाथ नित्य निमग्न होते, एका आत्म्यालाच देव म्हणून घट्ट धरून बसणारे निर्गुणवादी व मूर्ति आणि सगुण तेवढेंच थोर म्हणून बसणारे प्रतिमापूजक ह्या दोहोंच्या मधल्या म्हणजे दोहोंनाही आपल्या पोटांत घेणाऱ्या भागवतधर्माचे नाथ हे एक प्रमुख

प्रवर्तक होत! मूर्तिपूजेची जे नुस्ती भक्तिशून्य कवाईत करितात, बकरीं, कोंबडीं वगैरे देवाला अर्पून कामनिक व्रतांचेंच आचरण करितात, देव संकोचून लहान झाला आहे व केवळ मूर्तींतच आहे असे जे मानतात त्यांची त्यांनीं भीड बाळगली नाहीं व प्रतिमापूजन व सगुणोपासना यांचा उच्छेद करूं पाहणाऱ्यांचीही त्यांनीं भीति बाळगली नाहीं. स्थूळ तेंच सूक्ष्म, दृश्य तेंच अदृश्य, व्यक्त तेच अव्यक्त, सगुण तेंच निर्गुण, आंत तेच बाहेर—असा त्यांनीं सर्वत्र सारखा डांगोरा पिटला आहे.

१२ सगुण निर्गुण एकच हें प्रतिपादन नाथांनीं भागवतांत पुष्कळ ठिकाणीं मोठ्या बहारीचें केलें आहे; एके ठिकाणीं तर सगुणोपासनेचें मर्म त्यांनीं उत्तम सांगितलें आहे (भागवत, अ० ११ ओव्या १४५८–१५०४ पहा) त्यांत ते म्हणतात:—

विघुरलें तें तूप होये। थिजलें त्यापरीस गोड आहे।
निर्गुणापरिस सगुणीं पाहे। अतिलवलाहे स्वानंदू ॥ १ ॥
निर्गुणाचा बोध कठिण। मनबुद्धिवाचे अगम्य जाण।
शास्त्रांची न कळे ऊणखूण। वेदीं मौन धरियेलें ॥ २ ॥
तेसी सगुणमूर्ती नव्हे जाण। सुलभ आणि सुलक्षण।
देखतां जाय भूकतहान। निवताहे मन सप्रेमें ॥ ३ ॥
जो नित्यसिद्ध सच्चिदानंदू। प्रकृतिपरु परमानंदू।
सगुण जाला जी गोविंदु। स्वानंदकंदु स्वलीला ॥ ४ ॥

धैर्य वीर्य उदार कीर्ती । गुणगांभीर्य शौर्य ख्याती ।
यांसी कारण माझी सगुण मूर्ती । जाण निश्चिती उद्धवा ॥५
माझे ये मूर्तीचेनि दर्शनें । होत डोळियां पारणें ।
जन्ममरणांचें उठवी धरणें । खत फाडणें विषयांचें ॥ ६ ॥
दीपकलिका हातीं चढे । तैं घरभरीं प्रकाशू सांपडे ।
माझी मूर्ती जैं ध्यानीं जडे । तैं चैतन्य आंतुडे अवघेंची ॥७॥
या उपपत्ती उद्धवा देख । सगुण निर्गुण दोन्ही एक ।
जाण पा निश्चयो निष्टंक । सच्चिदानंदसुखसमत्वें ॥८ ॥
जो कसू सुवर्णाचिये खोटीं । तोचि वाला एका कसवटी ॥
सगुणनिर्गुणपरिपाटीं । नाहीं तुटी चित्सुखा ॥ ९ ॥

ही उपपत्ति अत्यंत बहारीची आहे. सगुणनिर्गुणांचा अभेद ही भागवतधर्माची शिकवण असल्यामुळें मूर्तिपूजा साधूसंतांनीं कोठेंही अवमानिली नाहीं. नाथांनीं २७ व्या अध्यायांत तर पूजाविधीचें सविस्तर वर्णन केलें आहे, तें भाविकांनीं अवश्य मननपूर्वक वाचावें. तशीच ११ व्या अध्यायांतील ३७।३८ ह्या श्लोकांवरील नाथांची टीका पहावी. नाथांनीं ७ व्या अध्यायांत ह्मटलें आहेः—

देवासी पूर्वीं नामचि नाहीं । त्यासी भक्तीं प्रतिष्ठूनि पाहीं ॥
नामरूपादि सर्वही । नानाविलासही अर्पिले ॥ ४७९ ॥
ऐसा देव भक्तीं थोर केला । आणूनि वैकुंठीं बैसविला ॥
भक्तउपकारें दाटला । मग त्याच्या बोलामाजी वर्ते ॥४८०॥

देव भक्तवचनें करी । झाला नर ना केसरी ॥
प्रगटला खांबामाझारीं । शब्द करी भक्ताचा ॥ ४८१ ॥
आतांही प्रत्यक्ष प्रमाण । दासाचेनि वचनें जाण ॥
पाषाणप्रतिमे देवो आपण । आनंदघन प्रगटे पै ॥ ४८२ ॥

ह्या शेवटच्या ओवींत नाथांना वारंवार आलेला अनुभवच त्यांनीं संकलितरूपानें सांगितला आहेसें वाटतें ! वरील प्रसंगीं त्या कर्नाटकी सावकारानें आणलेल्या विठ्ठलमूर्तीची स्थापना झाली तेव्हां नाथांच्या प्रेमास्तव देवानें त्यांच्या हातचा लोण्याचा गोळा खाल्ला अशी प्रसिद्धि आहे ! देवासंबंधानें २।३ उत्कृष्ट अभंग देऊन हें प्रकरण आवरून घेतों:—

१.

मी तोचि माझी प्रतिमा । तेथें नाहीं आन धर्मा ॥ १ ॥
तेथें असे माझा वास । नको भेद आणि सायास ॥ २ ॥
कलियुगीं प्रतिमेपरतें । आन साधन नाहीं निरुतें ॥ ३ ॥
**एकाजनार्दनीं** शरण । दोनीं रूपें देव आपण ॥ ४ ॥

२.

देव सर्वांठायीं वसे । परि न दिसे अभाविकां ॥ १ ॥
जळीं स्थळीं पाषाणीं भरला । रिता ठाव कोठें उरला ? ॥ २ ॥
जिकडे पाहे तिकडे देव । अभाविकां दिसे वाव ॥ ३ ॥
**एकाजनार्दनीं** नाहीं भाव । तंव तया न दिसे देव ॥ ४ ॥

३.

एकपणें पाहतां सृष्टी। भरला दृष्टीं विठ्ठल ॥ १ ॥
नाहीं द्वैताची भावना। बैसला ध्याना विठ्ठल ॥ २ ॥
भींतूपणा वोस ठाव। भरला सर्व विठ्ठल ॥ ३ ॥
ध्यानीं विठ्ठल मनीं विठ्ठल। **एकाजनार्दनीं** अवघा विठ्ठल ॥ ४ ॥

१३ नाथांच्या चरित्रांत त्यांच्या साधुत्वाच्या ज्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत, त्या पुढें निराळ्या प्रकरणांत सांगण्यांत येतील. पितरांसाठीं केलेलें अन्न चित्ताच्या कळवळ्यानें महारांस देणें, चोरांस जेवूं घालणें, उन्हांत तळमळणारे महारांचें पोर कडेवर घेऊन त्याच्या आईकडे पोंहचविणें, कावडीचें पाणी गाढवास पाजून त्याची तृषा शांत करणें, इत्यादि अनेक गोष्टींवरून नाथांच्या समचित्त-त्वाची व भूतदयेची चांगली साक्ष पटते. स्वस्त्रीच्या पाठीवर उडी मारून बसणाऱ्या ब्राह्मण्यास पुत्रासारखें लेखणें व नित्य अंगा-वर थुंकणाऱ्या यवनासाठीं १०८ वेळां स्नान करणें ह्या गोष्टी त्यांच्या अनुपम शांतीची ओळख करून देणाऱ्या आहेत. कृष्णदास लोळे या रामायणकर्त्या कवीचें मरण लांबविणें, विठ्ठलमूर्तीला लोणी खावया लावणें, नंदीला कडबा चारणें, दगडांचे परीस करणें, श्राद्धाला ग्रामस्थांचे पितर स्वर्गांतून उतरवणें इत्यादि चमत्कार नाथांच्या साधुत्वाला भुलून आपलें प्रभुत्व सोडून देव भक्ताचे अंकित कसे झाले ह्या गोष्टीच्या ज्ञापक आहेत. नाथ हे लोकोत्तर विभूति

व हरिप्रिय भगवद्भक्त आहेत अशी जी हजारो लोकांची शुद्ध भावना, ती अशा गोष्टी लोकप्रिय होण्याचें मुख्य कारण आहे. नाथ पंढरपुरास गेले असतांना तत्रस्थ लोकांनीं व हजारो वारकऱ्यांनीं त्यांचा सत्कार केला; ते आळंदीस गेले असतांना श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें साक्षात् दर्शन घेऊन आले; काशीस गेले तेव्हां त्यांचा छळ करणारे संन्याशी व हजारो विद्वान् शास्त्री अखेर त्यांच्या भागवताचा जगजयकार करण्यास व त्यांच्या पायांवर लोटांगणें घालण्यास उत्सुक झाले; ह्या सर्व गोष्टी नाथांच्या लोकमान्यतेची यथार्थ कल्पना देण्यास समर्थ आहेत. रुक्मिणी स्वयंवर, भागवत, भावार्थ रामायण, इतर दहापांच ग्रंथ व हजारो अभंग हे त्यांच्या भगवत्स्फूर्तीचे साक्षीदार अखंड खडे उभे राहणारे आहेत. ह्या प्रमाणें गृहस्थाश्रमाची दीक्षा घेतल्यापासून सारा जन्म परोपकारांत खर्च करून हजारो जीवांना उद्धरून ह्या महापुरुषानें शके १५२१ मध्यें देह ठेवला.



# ७ नाथांची गुरुभक्ति.

गुरुसांप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम ॥
गुरुपरिचर्या नित्यकर्म । जयाचें गा ॥ ४४५ ॥

जयाचें वक्त्र । वाहे गुरुनामाचे मंत्र ॥
गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ॥ ४४६ ॥

ज्ञानेश्वरी अ० १३,

१ जनार्दनस्वामींचें निर्याण. २ पैठणची षष्ठी. ३ गुरुभक्तीचें यथार्थ स्वरूप.

१ शके १४९७ च्या सुमारास ह्मणजे नाथांचा भागवत ग्रंथ पूर्ण झाल्यावर दोन वर्षांनीं जमार्दनस्वामींनीं देह ठेविला. जनार्दन स्वामींच्या अनेक शिष्यमंडळींत रामाजनार्दन, एकाजनार्दन व जनीजनार्दन हे तीन मुख्य शिष्य होते व या तिघांतही एकनाथ हे त्यांचे पट्टशिष्य होत. **रामाजनार्दन** यांना विठलाचा वर होऊन ' आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा ' ही त्यांची आरती सर्वमान्य झाली. ही आरती ह्मटल्याशिवाय वारकऱ्यांचें भजन सांग होत नाहीं. **जनीजनार्दन** हे नाथांच्या पश्चात् दोन वर्षांनीं ह्म० शके १५२३ मध्यें श्रावण वद्य ७ स अभिजित् मुहुर्तीं देह ठेविते झाले. हे विजापूरच्या पातशाहींत कमाविसदार होते. यांचें उपास्य गणपति होतें. पैठणाजवळ गंगामसाले गांवीं यांनीं श्रीगणपतीची

स्थापना केली आहे. बीड येथील पाटांगण नामक देवस्थानचे अधिकारी हे जनीजनार्दनांचे वंशज होत. तिसरे शिष्य एकाजनार्दन हे तर प्रस्तुत चरित्राचे नायक जगविख्यातच आहेत. ह्या तिघां-शिवाय त्यांचे अनेक शिष्य होऊन गेले. जनार्दनस्वामी हे एक असामान्य पुरुष होऊन गेले. त्यांची कीर्ति नाथांसारख्या अद्वितीय शिष्यानें दिगंतीं फांकली. अकर्तात्मबोधानें राहिल्यास गृहस्था-श्रमांतही भगवत्प्राप्ति होते असें त्यांनीं आचरून दाखविलें. स्वामींची वस्ती जरी देवगडावर होती तरी त्यांनीं फाल्गुन वद्य ६ स धौम्य गांवीं आपला देह ठेविला. हें गांव नगर जिल्ह्यांत जामखेड व शेवगांव तालुक्यांच्या हद्दीवर असून तेथें दरसाल सदर दिवशीं उत्सव होत असतो.

२. जनार्दनस्वामींनीं देह ठेवल्याचें वृत्त नाथांस कळलें तेव्हां पूर्ण-बोधामुळें त्यांची ब्रह्मस्थिति भंग पावली नाहीं. ‘मरका गुरु रडका चेला । दोहींचा बोध वायां गेला’ (ना भा. अ. २९-८९७) अशा गुरुशिष्यांपैकीं ही जोडी नव्हती. गुरु मरके नव्हते व शिष्य रडका नव्हता ! नाथांनीं उद्धवास सांगून साहित्य कर-विलें व षष्ठीचा उत्सव मोठ्या थाटानें केला. नाथचरित्रांत षष्ठीचें माहात्म्य अतिशय आहे, त्याचें कारण असें आहे कीं, फाल्गुन वद्य ६ ह्या तिथीस पांच महत्वाच्या गोष्टी झाल्या आहेत. नाथांनीं पहिल्या महोत्सवाच्या प्रसंगीं उद्धवास सांगितलें कीं:—

वद्य षष्ठी फाल्गुन मास । श्रीजनार्दन जन्मदिवस ।
दत्तात्रेयदर्शनविलास । प्राप्त त्यास तेचि दिनीं ॥ २३ ॥
आम्हांसि जनार्दनाची भेटी । झाली तेव्हां हेचि षष्ठी ।
त्याचियोगें अभिनव दृष्टी । सर्व सृष्टि अद्वयत्वें ॥ २४ ॥
श्रीजनार्दन स्वच्छंदगती । येचि दिनीं देहाकृती ।
लोपोनियां सुखस्थिति । निजधामाप्रती पै गेला ॥ २५ ॥
चारी पर्व निश्चित । उत्साह करणें उचित ।
जाणोनियां यथास्थित । करावें उचित साहित्या ॥ २६ ॥
पांचवे पर्व याच दिनीं । होतां पुढें देखसी नयनीं ।
षष्ठी पंचपर्वश्रेणी । विख्यात जनीं भावार्थिया ॥ २७ ॥

—केशवकृत नाथचरित्र अ० १०

हीच गोष्ट महिपतींनींही भक्तलीलामृतांत सांगितली आहे, त्यावरून असें स्पष्ट होतें कीं, १ जनार्दनस्वामींचा जन्म, २ जनार्दनस्वामींस दत्तदर्शन, ३ जनार्दनस्वामींचा नाथांवर अनुग्रह, ४ जनार्दनस्वामींचा देहलोप, व ५ पुढें होणारा नाथांचा देहत्याग हे पांचही प्रसंग फाल्गुन वद्य ६ ह्याच एका तिथीस घडले व त्यामुळें ही पंचपर्वश्रेणी भावार्थी लोकांत विख्यात होऊन बसली ! पैठणास षष्ठीचा जो उत्सव होतो तो नाथांच्या निर्याणानंतर त्यांची पुण्यतीथ म्हणून सुरू झाला असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे, पण खरा प्रकार तसा [illegible] षष्ठीचा उत्सव नाथांनीं स्वतः गुरूंची पुण्य-

तीथ म्हणून सुरू केला व गुरुस्वरूपांत नाथ समरस होऊन मिळून गेल्याची लोकांस प्रतीति यावी म्हणूनच कीं काय कोण जाणे, गुरूंच्या पुण्यतिथींच्या दिवशींच नाथांनींही आपल्या देहाचें विसर्जन केलें ! पैठणची षष्ठी वरील पांचही पुण्यप्रसंगांचें स्मारक असल्यामुळें त्या दिवशीं तेथें प्रचंड यात्रा भरत असते असो. जनार्दनस्वामींच्या देहलोपाच्या पहिल्या वर्षी नाथांनीं महोत्सव करून कीर्तन, भजन व अन्नदान यांनीं हजारों जीव तृप्त केले; पण त्यामुळें नाथांस वाण्याचे ७०० रुपये कर्ज झाले. वाण्यानें फार तसदी लावली तेव्हां देवानें उद्धवरूपानें ते स्वतः जाऊन फेडले !

३ नाथांची गुरुभक्ति अपूर्व होती, गुरुशिष्यांच्या जोड्या आजकाल गल्लोगल्लीं पडल्या आहेत, पण नाथांसारखा विरक्त शिष्य व जनार्दनस्वामींसारखा विचारवंत गुरु यांच्या संयोगाचा योग कांहीं विलक्षण आहे. नाथांचें श्रद्धाबळ व प्रज्ञाबळ दांडगें होतेंच, पण जनार्दनस्वामींसारखा दत्तस्वरूप सद्गुरु जोडण्याला त्यांचें दैवबळ त्याहूनही दांडगें असलें पाहिजे ! एखाद्या मनुष्याला तीव्र क्षुधा लागावी आणि लगेंच पंचपक्वान्नाचें ताट त्याच्यापुढें वाढून यावें तसाच प्रकार नाथांचा झाला. पूर्वाभ्यासबलानें निष्पाप झालेल्या ह्या शिष्याला जनार्दनस्वामींनीं लोहचुंबकाप्रमाणें आकर्षून आपल्याकडे नेलें व स्वामींच्या ह्या दयाळुपणाचें त्या शिष्योत्तमानें सार्थक केलें. नाथांची स्वामींवर देवतुल्य श्रद्धा होती. गुरु आणि देव

दोन नाहींत किंबहुना देवपणीं स्थापणारा गुरु देवाहूनही थोर आहे असें त्यांनींच आपल्या भागवतांत म्हटलें आहे. मनुष्याला उपासनेसाठीं सगुणदेवाची एखादी मूर्ति पुढें ठेवावी लागते. अखंड ध्यानधारणादिकांनीं ती मूर्ति प्रत्यक्ष बोलत्याचालत्या रूपानें पुढें प्रकट व्हायला व सगुण साक्षात्कार व्हायला प्रचंड एकनिष्ठता लागते. ज्या रूपाचें ध्यान करावें त्याच रूपांत भक्तासाठीं प्रकट होणें देवाला भाग आहे. पण एवढेही सायास न करितां पुढें प्रत्यक्ष असलेल्या सगुण व साकार सद्गुरूलाच परमात्मभावानें पूजणें व तोच सद्गुरु आपल्यासकट विश्वाच्या अंतरांत आंतबाहेर भरून राहिला आहे असें नित्य भावणें यालाच **गुरुभक्ति** ह्मणतात! नाथांची भावना प्रचंड होती व स्वामी समर्थ होते. शिष्य शुद्ध असणें, गुरु समर्थ असणें व शिष्याची भावना दृढ असणें ह्या त्रिवेणीसंगमांतच निर्मळ गुरुभक्तीचें शुद्धस्वरूप पाहण्यास सांपडतें. गुरु व देव यांत भेद नाहीं, सगुण देव व निर्गुण देव यांत भेद नाहीं, देव व विश्व[1] यांत भेद नाहीं व देव व आपण यांत भेद नाहीं अशा अभेद भक्तीचें मर्म नाथांना गुरुसेवेंतच कळून आलें. भागवतधर्मांत अद्वैत व भक्ति यांचा फार बहारीचा मिलाफ झालेला आहे. द्वैतभक्तींत श्रम व खंडितता असतात,

---

१ ह्मणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ॥
तैसा नोहे उखितें । आघवें मीचि ॥१२८॥

ज्ञानेश्वरी अ० १४

पण अद्वैतभक्तींत ह्म० अभेदभक्तींत आयास व खंडपणा नसतात. ह्या गोष्टी गुरुगम्यमार्गानें जाऊनच कळणाऱ्या आहेत. ‘ अद्वैतीं भक्ति आहे । हें अनुभवाचि जोगें नव्हे । बोलाया ऐसें ’ ( अ० १८--११५१ ) असें ज्ञानेश्वरमहाराजांनीं स्पष्ट सांगितलें आहे. अभेदगुरुभक्तीचा सुखसोहळा उद्धवार्जुनासारखा अलीकडे नाथज्ञानेश्वरांनीं भोगला आहे व त्यांच्या चरित्रांत आणि ग्रंथांत मुख्य जादु आहे ती येथेंच आहे. गुरुसेवेनें विषयवासना निर्मूळ होतात, चित्त चिद्रूप होतें, विश्वाभास मावळून देहातीत देव हा आपणच अंगें होतो, काया ब्रह्मरूप होते, एकपणाचा उदय होतो, दुजेपणा मावळून सर्वगत स्वस्वरूपाविर्भाव होतो, व तोही पाहायला कोणी राहत नाहीं. नाथांनीं गुरुसेवेंत अनुभव मिळविला ह्म० ते अंगेंच अनुभव झालें. ज्यांना गुरुपदनखकांतिछटांमध्यें स्वानुभवाचें अनर्घ्य रत्न सांपडलें त्यांनीं आपल्या ग्रंथांत, अभंगांत व आचरणांत गुरुपणावांचून काय वानावें? नाथांच्या ग्रंथांत गुरुबद्दल शतशः धन्योद्गार प्रकट झालेले आहेत. नाथांनीं अनेक अभंगांतून:—

( १ ) ध्यानीं ध्यातां गुरुराया । ब्रह्मभूत होय काया ॥

( २ ) जनार्दनें माझें केलें असे हित ।<br>
दाविला देहातीत देव मज ॥ २ ॥

( ३ ) धन्य धन्य सद्गुरुराणा । दाखविलें ब्रह्मभुवना ॥

( ४ ) संसार अजगर झोंबला विखार ।
धन्वंतरी थोर जनार्दन ।

( ५ ) जनार्दनाचा एका लडिवाळ तान्हा ।
पाजी प्रेमपान्हा जनार्दन ॥

इत्यादि अनेक प्रकारांनीं गुरूप्रेमाचे उद्गार काढले आहेत. नाथांची जनार्दनस्वामींविषयीं जी अपार भक्ति होती तिची अर्वाचीनांस कांहींशी कल्पना पाहिजे असल्यास स्वामी विवेकानंदांचे श्रीरामकृष्ण परमहंसाविषयींचे उद्गार[1] वाचावेत. सच्छिष्य होऊनच सद्गुरुप्रेम ओळखावें. एकनाथ महाराज आपल्या अभंगांतून वेद तो आह्मां जनार्दन, शास्त्र जनार्दन, पुराण जनार्दन, योग जनार्दन, तप जनार्दन, कर्मधर्म जनार्दन व सर्व जनार्दन असें कां म्हणतात हें सच्छिष्य झाल्याशिवाय समजणार नाहीं. 'श्रीगुरूचे नाममात्र । तेंचि आमचें वेदशास्त्र' ह्या मनोभावनेचें मर्महि गुरुसेवेनें कृतार्थ झाल्यावरच

1 "I began to go to that man (रामकृष्ण परमहंस) day after day, and I actually saw that religion Could be given. One touch, one glance, can change a whole life! I have read about different luminaries of ancient times how they could stand up and say 'Be thon whole' and the man became 'whole!' I now found it to be true, and when I myself saw this man, all scepticism was brushed aside... ... In the presence of my master I found out that man conld be perfeet, even in this body."

कळणार आहे. गुरुसेवा, गुरुसहवास, गुरुनाम, गुरुकृपा ही एवढी प्रचंड शक्ति आहे कीं, त्या शक्तीपुढें अन्य सर्व साधनें लुलीं आहेत. पहा बरें ! देवगडावर जनार्दनस्वामींच्या सहवासांत बारा वर्षांत एकनाथासारखा जो महात्मा तयार झाला, असा महात्मा हिंदुस्थानांतील सहस्रावधि शाळा, शेंकडो कॉलेजें आणि सगळ्या युनिव्हर्सिट्या मिळून ५० वर्षांत एक तरी निर्माण झाला आहे काय ? याचें कारण एवढेंच कीं, अनंत शास्त्रें शिकवणाऱ्या सर्व विद्यापीठांपेक्षां एका गुरुगृहवासाचें सामर्थ्य जास्त आहे. शास्त्रग्रंथ आणि विद्यापीठें यांहून स्वानुभवसंपन्न महात्म्याच्या सेवेचें फळ अनंतपटीनें जास्त आहे. नाथांनीं 'वेदांतसिद्धांत पाहणें ते आटी। जनार्दनभेटी निरसली' ह्या अभंगांत नुसत्या शास्त्राध्ययनानें आत्मबोध झाला नसता तो गुरुचरणसेवेंत मला झाला म्हणून म्हटलें आहे. शाळा, विद्यापीठें, शास्त्रें यांचा उपयोग नाहीं किंवा तीं तुच्छ आहेत असें नाहीं, तर महापुरुषसेवेंत अल्पायासानें जें महत्कार्य होतें तें महत्प्रयासानेंही दुसऱ्या कशानेंही होणें नाहीं. 'महत्सेवा द्वारमाहुर्विमुक्तेः' किंवा 'सद्गुरूवांचूनी सांपडेना सोय' इत्यादि वचनांचा हाच अर्थ आहे. शास्त्रग्रंथ वाचून जो संस्कार मनावर होत नाहीं तो अधिकारी मनुष्याचें आचरण पाहून सहज होतो. शास्त्रें फार तर बुद्धि प्रगल्भ करितील, पण बुद्धीचें कवाड उघडून 'यो बुद्धेःपरतस्तु सः' त्या परमात्मस्वरूपाची ओळख संत म्ह०

सद्गुरु कृपा करितील तरच होणार आहे. जड-भरतानें रहूगणाला उपदेश करितांना (भागवत स्कंध ५ अ० १२) ह्मटलें आहे:—

रहूगणैतत्तपसा न याति न चेज्यया निर्वपणाद्गृहाद्वा ।
न च्छंदसा नैव जलाग्निसूर्यैर्विना महत्पादरजोभिषेकम् ॥ १२॥

हें परमज्ञान तपानें, यज्ञानें, अन्नसंतर्पणानें, गृहस्थाश्रमांत राहून परोपकार केल्यानें, वेदाभ्यासानें, जल, अग्नि व सूर्य यांची उपासना केल्यानें—कशानेंही प्राप्त होत नाहीं, तर केवळ महत्पाद-रजोभिषेकानें ह्म० सत्पुरुषाची पायधूळ मस्तकीं धारण केल्यानेंच तें प्राप्त होतें! संतचरणीं हें ज्ञान कसें मिळतें? जडभरत ह्मणतात.

यत्रोत्तमश्लोकगुणानुवादः प्रस्तूयते ग्राम्यकथाविघातः ।
निषेव्यमाणोऽनुदिनं मुमुक्षोर्मतिं सतीं यच्छति वासुदेवे ॥ १३ ॥

ह्मणजे संतांच्या घरीं भगवंताचा गुणानुवाद सतत चाललेला असतो व त्यामुळें विषयकथांना सहज प्रतिबंध होतो. त्या हरीच्या प्रेमकथा अहर्निश ऐकतां ऐकतां मुमुक्षूची बुद्धि निर्मळ होऊन वासुदेवात्मक होते. संतांच्या घरींदारीं, आंतबाहेर, क्रियेंत, वाचेंत व मनांत हरिप्रेमावांचून दुसरें कांहीं आढळायचेंच नाहीं. संतांचें कर्म, ज्ञान व भक्ति हरिमय असतात. शांति, क्षमा, दया इत्यादि सद्गुण संतांच्या अंगणांत लोळत असतात. तेथें राहिल्यानेंही मुमुक्षूंचा उद्धार होतो. संतसेवा ह्म० गुरुसेवा हें मोक्षाचें दार

असल्यामुळें त्याचाच आश्रय आत्महितेच्छु करितात. भगवंतांनींही गीतेंत ज्ञानप्राप्तीचें साधनः—

तद्विद्धिप्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।

उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः ॥ ४–३४ ॥

हेंच सांगितलें आहे. ह्या अनुभविक तत्वाप्रमाणें जनार्दनस्वामींच्या पायापाशीं वास केल्यामुळें नाथांना सहज ब्रह्मज्ञान प्राप्त झालें, तें त्यांच्याही घरीं खेळणें झालें. 'भगवत्प्राप्ति जाहली अहोरातीं खेळणें' ह्मणून त्यानींच म्हटलें आहेः—

उपेक्षूनियां निजमुक्ति । एका जनार्दनीं पढिये भक्ती ।
त्याचेनि प्रसादें भगवत्प्राप्ति । जाली अहोरातीं खेळणें ॥
तो जरी भगवत्प्राप्ति नेघे । तरी ते दाटूनि घर रिघे ।
ऐसें गुरुभक्तीचेनि योगें । देवो सर्वांगें भूलला ॥

—श्रीनाथभागवत अ० १३–५४।५

नाथांनीं ह्या दोन ओव्यांत तर फारच बहार केली आहे. 'देव माझ्या गुरुभक्तीला इतका भुलला कीं तो माझ्या अंतःकरणांत घुसून अहोरातीं खेळणें होऊन राहिला आहे ! गुरुसेवेनें भक्तीचें भांडार मला खुलें झालें आहे व कळिकाळाची ही आतां माझ्यावर सत्ता चालणार नाहीं' असें त्यांनीं अनुभवाच्या जोरानें म्हटलें आहे. 'सद्गुरुकृपा हातीं चढे । तेथें भक्तीचें भांडार उघडे ।

तेव्हां कळिकाळ पळे पुढें । कायसें बापुडें भवभय ! (भागवत अ. २–४८४) असो. नाथांच्या चारित्रांत व ग्रंथांत अत्यंत महत्वाची गोष्ट म्हणजे त्यांची अनुपम गुरुभक्ति हीच असल्यामुळें तिच्या संबंधानें त्यांच्या ह्या अल्पचरित्रांतही मला एवढा विस्तार करावा लागला. गुरुप्रसाद झाल्यावर नाथ पूर्णत्वास पोंचले. त्यांचें खरें चारित्र येथेंच संपलें. त्यांचें ह्या पुढचें चारित्र म्हणजे त्यांच्या केवळ लीला होत. 'जनार्दना पढियें एकपण । एका पढियें जनार्दन । स्वरूप एक नामें भिन्न । अनन्यशरण या नांव' असें त्यांनीं भावार्थरामायणांत म्हटल्याप्रमाणें एकपणाची स्थिति त्यांना प्राप्त झाल्यानंतर कर्तव्य कांहींच उरलें नाहीं. दया, क्षमा, क्षांति, व समता हे गुण म्हणजे एकत्वाच्या पायरीवर स्थिरासन घालून बसल्यानंतरचे सहजभाव आहेत ! या गुणांचेंच जग चोज करीत बसतें पण ते गुण ज्या गुरुकृपाजन्य एकपणाच्या अखंडानुभवाचे बाह्यरंग आहेत, त्याचें मर्म जाणणारे विरळा! असो. नाथांचे गुरुप्रसादाचे दोन अभंग देऊन हा विषय पुरा कारितों !

१

सद्गुरुराय माझा आनंदसागर । त्रैलोक्या आधार गुरुराव ॥ १ ॥
गुरुराव स्वामी असे स्वप्रकाश । ज्यापुढें उदास रविशशी ॥ २ ॥
वेदां पडले मौन शास्त्रें वेडावलीं । वाचा हे निमाली ते श्रीगुरु ॥ ३ ॥

श्रीगुरु जयासी पाहे कृपादृष्टी। तयासी हे सृष्टि पांडुरंग ॥ ४ ॥
प्रभुराज माझा स्वामी गुरुराव। देतो मज भाव शुद्ध भूमी ॥ ५ ॥
भूमी शुद्ध करी ज्ञानबीज पेरी। अद्वैत हें धरी मीं तूं नेणे ॥ ६ ॥
पहा गुरुराये ब्रह्म दाखविलें। अखंड स्मरवीलें मज नाम ॥ ७ ॥
मजलागी माझी सद्गुरुमाउली। कृपा करी साउली वर्णूं काय ॥ ८ ॥
यया दासा मनीं सद्गुरूचें ध्यान। झालासे तल्लीन गुरुपायीं ॥ ९ ॥
**एकाजनार्दनीं** गुरु परब्रह्म। तयाचें पै नाम सदा मुखीं ॥ १० ॥

## २

सद्गुरूचे पाय जयासी लाधलें। तेणें निरसलें प्रपंचाशीं ॥ १ ॥
अहर्निशीं चित्त ब्रह्मींच रंगलें। विषय उरले नाहीं तया ॥ २ ॥
नाहीं त्यासी मनीं द्वैताद्वैतभाव। आत्मस्थिति भाव सर्वजगीं ॥ ३ ॥
सद्गुरुरायानें केली मज कृपा। ब्रह्मानंद सोपा केला मज ॥ ४ ॥
सदा करी मन सद्गुरुअर्चन। तेणें समाधान होय त्यासी ॥ ५ ॥
लय तेथें असे सकळ कल्पनांचा। तेथें इंद्रियांचा काय पाड ॥ ६ ॥
काय पाड असे अंतरइंद्रिया। चारी देह वाया जाले जेथें ॥ ७ ॥
झालें जेथें लीन मन इंद्रिय प्राण। त्या सुखा वर्णन कैसें होय ॥ ८ ॥
कैसें होय वक्ता वाच्य आणि वचन। त्रिपुटी हे क्षीण जया ठायीं ॥ ९ ॥
मावळला आतां जगदंधकार। समूळ संसार पारुषला ॥ १० ॥
सद्गुरूच्या कृपें हरपे जीवशीव। ब्रह्म एकमेव अद्वितीय ॥ ११ ॥
भोगितसों आम्हीं सुखें परमानंद। कोटि हे आनंद वसती जेथें ॥ १२ ॥

ब्रह्मसुखें झालों मी सदा संपन्न । ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ १३ ॥
गुरूचे चरण ध्यावे सर्वकाळ । प्रपंच सकळ सांडोनीयां ॥ १४ ॥
सांडोनीयां म्हणजे मिथ्या हा पहावा। सद्गुरु करावा पाठी राखा ॥ १५ ॥
पाठिराखा होय सद्गुरु जयासी । कळिकाळ त्यासी बाधतीना ॥ १६ ॥
एकाजनार्दन गुरुपदीं मस्तक । ठेवूनी सम्यक ब्रह्म झाला ॥ १७ ॥



# ८ नाथांच्या साधुत्वाच्या गोष्टी.

सगुण उपासक परमहित निरतनीति दृढनेम।
ते नर प्राणसमान मम जिनके द्विजपर प्रेम ॥

तुलसीदास.

१ अंगावर थुंकणारा यवन. २ नाथांस राग आणणारास दोनशें रुपयांचें बक्षीस ! ३ श्राद्धान्न व महार. ४ दंडवत स्वामी. ५ क्षुधित ब्राह्मणाचा सत्कार. ६ वडाऱ्यांची संभावना. ७ गाढवास प्राणदान. ८ विष्णुसहस्रनामाचा पाठ. ९ एका वेश्येचा उद्धार. १० चोरांचा सत्कार. ११ राण्या महार व त्याची बायको. १२ परीसवाला ब्राह्मण. १३ अंत्यजाचें पोर व कुष्टी ब्राह्मण. १४ महार व ब्रह्मराक्षस.

## उपोद्घात.

नाथांच्या चरित्रांत प्रसंगानें सांगाव्या लागणाऱ्या गोष्टी त्या त्या स्थळीं सांगितल्या आहेतच; पण त्याशिवाय आणखी अशा कांहीं मनोरम गोष्टी आहेत कीं, त्यांचा एका स्वतंत्र प्रकरणांत संग्रह करणें मला अवश्य वाटलें. नाथांच्या साधुत्वाच्या व चमत्काराच्या जितक्या गोष्टी महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत तितक्या बहुधा दुसऱ्या कोणत्याही साधुच्या नाहींत. नाथांना गृहस्थाश्रमांत वागतांना अनेक प्रकारचे प्रसंग आले व त्या प्रसंगीं ते ज्या धैर्यानें व शांतपणानें वागले तें धैर्य व ती शांति सामान्यतः कोणाच्याही आचरणांत दिसत नाहीं. नाथांच्या समदृष्टीला ब्राह्मण, वडारी, यवन, महार,

हे सारखेच दिसत होते व चोर आणि वेश्या यांना सुद्धा कृतार्थ करण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. भूतमात्रीं भगवद्भाव ठेवून ते बोलण्याप्रमाणें चाललें. वर्णाश्रमधर्म न सोडतां व भूतदयेच्या ऊर्मी आचरणांत आणतांना न कचरतां ते दोहींच्या योग्य प्रमाणांत वागले. निंदकांचा व छलकांचा त्यांनीं कठोर शब्दांनीं तिटकारा केला नाहीं इतकेंच काय, पण त्यांना ताळ्यावर आणण्यासाठीं त्यांनीं फार श्रम घेतले. परोपकारासाठींच त्यांचा अवतार होता. त्यांना राग आणणारास बक्षीस लावण्यापर्यंत जेथें मजल जाई तेथें शांतीचा कळस झाला असेंच म्हटलें पाहिजे पुढील गोष्टी नाथांच्या अंगीं मुरलेल्या भागवतधर्माच्या उत्तमत्वाच्या ज्ञापक आहेत. बोलल्याप्रमाणें वागून दाखविणारे ते महात्मे होते. " अभेदभक्ति वैराग्य ज्ञान । स्वयें आचरोनि आपण । देखीं लावावे इतर जन । लोकसंग्रह जाण या नांव " (भागवत २९–८१० ). शांति, दया, क्षमा यांची नाथ केवळ मूर्ति होते.

## १ अंगावर थुंकणारा यवन.

पैठणास नाथांच्या वाड्यांतून गंगेस जाण्यायेण्याच्या वाटेवर एक धर्मशाळेसारखी पडवी आहे. तेथें राहणारा एक यवन जाणाऱ्या येणाऱ्या हिंदु लोकांना खूप त्रास देत असे. नाथ स्नान करून येऊं लागले कीं, यानें त्यांच्या अंगावर पिचकारी टाकावी! यामुळें

एखादे दिवशीं नाथांस चारचार पांचपांच स्नानें व्हावींत. नाथ स्नान करून आले कीं, या उन्मत्त पुरुषानें त्यांच्या अंगावर थुंकावें व नाथांनीं पुन्हां गंगेवर स्नानास जावें. या प्रकारानें कोणाचेंही चित्त क्षुब्ध झालें असतें, पण नाथांची शांति इतकी अवर्णनीय होती कीं, त्या यवनाच्या कृपेनें आपणास गंगाबाईचीं इतकीं स्नानें होतात याबद्दल त्यांनीं उलट त्याचेच आभार मानावेत ! एके दिवशीं तर तो यवन आपल्या जागीं नव्हता म्हणून नाथ त्याचें व्रत चालविण्यास कांहीं वेळ उभे राहिले होते ! एकदा तो यवन बेताल होऊन सारखा नाथांच्या अंगावर थुंकत राहिला. त्यानें थुंकावें व नाथांनीं फिरून स्नान करावें असा प्रकार त्यादिवशीं १०८ वेळां झाला म्हणून सांगतात ! तथापि नाथांची शांति भंग पावली नाहीं ! क्रोध व सहनशीलता यांमधील हें द्वंद्वयुद्ध पाहण्यास हजारों लोक जमले होते. अखेरीस तो यवन हातटेकीस आला. त्यानें लाजेनें नाथांच्या पायांवर लोटांगण घातलें व त्यांच्या अनुपम साधुत्वाची फार तारीफ केली. आपल्या मशीदीची व आपल्या चार वेळ निमाज पढण्याच्या पद्धतीची स्तुति मात्र त्यानें रगड केली त्या वेळीं नाथ हंसून म्हणाले—

म्याहजदमे यानें अल्ला खडा । और क्या जगा खालीं पडा ? ॥१॥
चारो बखत है निमाजोंके । और क्या बखत है चोरोंके ? ॥२॥
**एकाजनार्दका** बंदा । जमीन अस्मान भरे खुदा ॥३॥

याचा अर्थः—जणूं काय मशीदींतच अल्ला खडा आहे, आणि बाकीची जागा काय त्यांवाचून रिती पडली आहे? ईशप्रार्थनेच्या वेळा चार आहेत आणि बाकीच्या वेळा काय चोराच्या आहेत? तर बाबारे! असे नव्हे. परमात्मा ह्मणजेच अल्ला. तो सर्वव्यापी सर्वज्ञ व सर्वसाक्षी आहे. तो सर्वांचा आहे, सर्वांच्या हृदयांत आहे व त्याची खरी प्रार्थना ह्मणजे त्याचें अखंड स्मरण चित्तांत ठेवून सर्व कर्तृत्व त्याचें आहे हें ओळखून निरहंकारपणानें वागणें ही होय. नाथांचें व त्या यवनाचें संभाषण झाल्यावर नाथ हा वडा अवलिया आहे हें त्यानें ओळखलें व त्यांच्याशीं यापुढें तो फार नम्रतेनें वागूं लागला.

## २ नाथांस राग आणणारास दोनशें रुपयांचें बक्षीस!

पैठणास नाथांचे निंदक व छलक ज्या एका ओट्यावर बसून कुटाळ्या करीत त्याला कुचरओटा किंवा कुटाळवंटा म्हणत! ती जागा पैठणास अजूनही दाखवितात. नाथांच्या कीर्तनानें ज्यांचें कपाळ उठें असे कांहीं करंटे पैठणास होतेच. ते ह्या ओट्यावर जमत व तंबाखू ओढीत, गांज्या पीत, सोंगट्या बुद्बळे किंवा गंजिफा खेळत तेथें रात्रीं बारावर एक वाजेपर्यंत बसत. फिदिफिदी हंसावें, इकडच्या तिकडच्या भाकडगोष्टी कराव्या, कोणाच्या कुचेष्टा कराव्या, कोणाच्या निंदा कराव्या, अनेक कारस्थानें रचावींत, कांहीं कुलंगडीं उपस्थित करून—याचे पाय त्याच्या

गळ्यांत व त्याचे पाय याच्या गळ्यांत-असें रिकामटवळे धंदे करावेत, बायकांच्याबद्दल अवाच्य गोष्टी काढाव्यात इत्यादि प्रकार तेथें होत असल्यामुळें त्यास कुचरओटा हें सार्थ नांव मिळालें होतें ! ! असें ग्रामकंटकांचे अड्डे बहुधा गांवोगांव असतातच ! असो. एके दिवशीं ते कुटाळ लोक रात्रीं ह्याप्रमाणें रिकाम-टेकडेपणाचा धंदा करीत बसले असतांना तेथें एक पांथस्थ ब्राह्मण आला. पैठण हें सुखवस्तु व विद्वान् लोकांच्या वस्तीचें गांव म्हणून प्रसिद्ध असल्यामुळें मुलाच्या मुंजीसाठीं शेंदोनशें रुपये तेथें जमल्यास पहावे म्हणून बिचारा गांवांत आला होता. तों त्याच्या दैवानें त्याची प्रथम ह्या कुटाळवंट्यावरच वरील ग्रामस्थांची गांठ पडली. ब्राह्मणही जरा तऱ्हेवाईकच होता. वरील कंटकांनीं त्यास सांगितलें कीं ' येथें एकनाथ म्हणून एक महासाधु राहतो. त्याला राग कसा तो येत नाहीं. त्याला राग आणून देशील तर तुला दोनशें रुपये आह्मी बक्षीस देऊं ! '. त्या ब्राह्मणानेंही नाथांस राग आणण्याची कंबर बांधली. कुटाळांना करमणुकीला हा नवा विषय मिळाला. ' नाथांना आपण राग तेव्हांच आणूं ' अशा उमेदीनें तो ब्राह्मण दुसऱ्या दिवशीं सकाळीं नाथांच्या वाड्यांत शिरला. नाथ त्यावेळीं देव-घरांत पूजा करीत बसले होते. तो ब्राह्मण वाड्यांत शिरला तों तडक देवघरापर्यंत गेला, व अंगावर कपडे व खांद्यावर पडशी असतांनाच नाथांच्या मांडीवर जाऊन बसला ! शांतीचा सागर

व धैर्याचा मेरु, असा तो महात्मा काय अशानें क्षुब्ध होणार? हास्यमुख करून नाथ त्यास म्हणाले. "आपल्या दर्शनानें मला फार आनंद झाला. भेटीला पुष्कळ लोक येतात, पण आपलें प्रेम कांहीं विलक्षण आहे! वाड्यांत शिरल्याबरोबर मला भेटण्याची आपणास उत्कंठा झाली हें खचित आपल्या प्रेमळ स्वभावाचें निदर्शक आहे!" ह्याप्रमाणें ब्राह्मणाचा पहिला बार फसला. हें प्रकरण फार जड आहे असें वाटून ब्राह्मण चिप् झाला, पण दोनशें रुपयांची आशा सुटेना म्हणून फिरून एकवार प्रयत्न करण्याचा त्यानें निश्चय केला! नाथांची स्नानसंध्या आटोपली. दुपारची जेवणाची वेळ झाली. त्या ब्राह्मणाचें पान नाथांच्या पानाशेजारीच मांडलें होतें. पान वाढणें झाल्यावर गिरिजाबाई तूप वाढण्यास आल्या व त्या ब्राह्मणाच्या द्रोणांत तूप वाढण्यासाठीं ओणव्या झाल्या तों त्या ब्राह्मणानें टुण्दिशीं गिरिजाबाईच्या पाठीवर उडी मारली! त्यासरसे नाथ गिरिजाबाईस ह्मणाले, 'हं! संभाळ हो. ब्राह्मण पडेल बिडेल एखादा!' गिरिजाबाई तरी नाथांची धर्मपत्नीच होती! त्या माउलीनें हंसत उत्तर केलें, 'आहे मला हरिपंडिताला पाठीवर घेऊन काम करायची संवय!! मीं माझ्या ह्या दुसऱ्या बाळाला अगदीं पाडायची नाहीं" हा प्रकार पाहतांच ब्राह्मण गर्भगळित होऊन नाथांच्या पायांवरच पडला. नाथांनीं त्यास उठवलें. त्या ब्राह्मणानें सर्व गोष्ट सांगितली व आपले दोनशे रुपये बुडाल्या-

बद्दल खेद दर्शविला. तेव्हां नाथ ह्मणाले 'अहो! तुम्ही मला हें आधींच कां नाहीं सांगितलेंत? तुह्मांला रुपये मिळणार होते तर मीही तुमच्यासाठीं रागावलों असतों!'

## ३ श्राद्धान्न व महार.

एकदां नाथांच्या वडिलांचें श्राद्ध होतें. स्वयंपाकाची सिद्धता होऊन क्षणाच्या ब्राह्मणांची वाट पहात नाथ दारांत उभे होते. इतक्यांत नाथांच्या दारावरून चारपांच महार चालले होते, त्यांच्या घ्राणेंद्रियांचा नाथांच्या घरांत सिद्ध झालेल्या पक्वान्नांच्या परिमलाशी संयोग होतांच ते सहज एकमेकांत म्हणाले, "वाहवा! असें सुग्रास अन्न आह्मांला कधीं तरी मिळेल कां? हे ब्राह्मण फार धन्य कीं ज्यांना रोज असें अन्न खायला मिळतें! आम्हीं करंटे, आह्मांला हा सुवाससुद्धां मिळायचा नाहीं!" हें त्यांचें भाषण नाथांच्या कानांत पडतांच त्यांचें हृदय द्रवलें. जितके देह तितकीं देवाचीं मंदिरें असें ते नित्य मानीत. महारांच्या देहरूपमंदिरांतील नारायणाला जें आवडलें तेंच द्यायचें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं त्या महारांना बोलावून सर्व श्राद्धीय अन्न त्यांच्या पदरांत टाकण्यास गिरिजाबाईस सांगितलें. गिरिजाबाई तरी नाथांचीच सहधर्मचारिणी! तिनें तें त्यांचें ह्मणणें मोठ्या आनंदानें कबूल केलें व आणखी उल्हासानें म्हणाली, "अन्न पुष्कळ आहे. अंत्यजांच्या बायकांना सुद्धां मुलांलेंकरांसकट बोलवा ह्मणजे येथेंच त्यांना सर्वांना

वाढूं. जनार्दन सर्वांभूतीं आहे तर ह्या अतिशूद्रांचीच आज तृप्ति करूं या." सर्व अंत्यज बोलावून आणल्यावर रस्त्यावर त्यांचीं पानें मांडलीं, गंधाक्षतापुष्पें जीं ब्राह्मणांसाठीं तयार करून ठेविलीं होतीं ती त्यांस अर्पण करण्यांत आलीं व सर्व साहित्य बाहेर आणून शूद्रांकडून त्यांस वाढविलें. यानंतर 'जनीं जनार्दन आहे निश्चित। हा भाव जाणोनि चित्तांत। संकल्प सोडी एकनाथ। भोक्ता कृष्णनाथ ह्मणवूनी' (भक्तविजय अ० ४६–६२) मुलांलेंकरांसह ते अनामिक जेऊन तृप्त झाले. ज्याचा वास सुद्धां त्यांना दुर्लभ होता तें अन्न बायकामुलांसह त्यांना यथेच्छ मिळालें. तें जेवण व त्यांतही नाथगिरिजाबाईचें कळवळयाचें प्रेमळ भाषण ऐकून तर त्या अंत्यंजाचे अंतरात्मे तृप्त झाले. विडे देऊन त्यांना बोळविल्यावर गिरिजाबाईनीं सर्व घर सडासंमार्जन करून धुतलें, भांडीं घांसून घेतलीं व उदकसामुग्री पुन्हां देऊन स्वयंपाक सिद्ध करण्यास सांगितलें. 'आम्हांला क्षण देऊन यानें अनामिकांस भोजन घातलें तर या भ्रष्टाच्या घरचें अन्नोदकही आपण सेवन करणार नाहीं असा ब्राह्मणांना वरील वृत्तांत कळतांच त्यांनीं कट केला! कित्येक ब्राह्मण तर नाथांच्या अंगणांत आले व अवाच्य बोलूं लागले. 'ब्राह्मणाचार लोपवून तूंच संकर करावयास आरंभ करितोस? आमच्या आधीं अंत्यजांस जेवूं घातलेस तर तुझे बापआजे काय अंत्यज होते? भानुदासांच्या

कुळांत हा काय भ्रष्ट जन्मास आला आहे' असें ह्मणून ते संतप्त झाले. नाथ बाहेर आले व आपली शांति यत्किंचितही ढळूं न देतां हात जोडून विनंति करून त्यांस ह्मणाले, "पहिला स्वयंपाक आपल्यासाठीं सिद्ध केला होता, पण त्याचा सुवास अंत्यजांनीं घेतल्यामुळें तें उच्छिष्ट अन्न तुह्मांस कसें वाढावें ह्मणून मी तें त्यांचें त्यांस वाढलें व आपल्यासाठीं पुन्हां सर्व तयारी करून स्वयंपाक सिद्ध केला आहे. आपण क्षमा करावी" पण हें नाथांचें ह्मणणें न पटल्यामुळें ते ब्राह्मण जळफळत आपापल्या घरीं गेले. नाथ मोठ्या फिकीरींत पडले. नाथांच्या घरीं श्रीखंड्या होताच! त्यानें नाथांस सुचविलें कीं, 'आपण उद्विग्न होऊं नका. पानें वाढा, प्रत्यक्ष आपले पितर येऊन पानावर बसतील![1]' याप्रमाणें पानें वाढलीं. 'आगतं' म्हणतांच सूर्यनारायण, चक्रपाणी, व भानुदास हे तिघे येऊन पानांवर बसले व नाथांनीं परमभक्तीनें त्यांची पूजा करून त्यांस वाढले. 'जनार्दनपायीं भाव धरिला। तोच पितृस्वरूपीं प्रकटला। एकनाथासी आनंद वाटला। कीं दृष्टीसी

---

१ हीच कथा अशीच कृष्णदयार्णवानें हरिवरदा ग्रंथांत ५२ व्या अध्यायांत, केशवानें नाथचरित्राच्या ११ व्या अध्यायांत व महिपतीनें भक्तलीलामृताच्या १७ व्या अध्यायांत वर्णिली आहे. फक्त नाथांच्या पितृत्रयींच्या ठिकाणीं ब्रह्मा-विष्णुमहेश ही देवत्रयी जेवून गेली असें त्यांनीं म्हटलें आहे; क्षणाला बोलावलेल्या ब्राह्मणांचे पितर जेवून गेले असें कोणीही म्हटलें नाहीं. नाथांचे पितर जेऊन तृप्त होऊन जाणें हेंच साहजिक आहे.

देखिला पितृलोक' (भक्तविजय अ. ४६–९१) यानंतर ती नाथांची पितृत्रयी तृप्त झाली व आशीर्वाद देऊन गुप्त झाली. नाथांचें पितृतर्पण खरें खरें झालें. ब्राह्मण येऊन पाहतात तों नाथांचे पितर साक्षात् जेवून गेल्याचें श्रीखंड्यानें त्यांस सांगितलें व जेवलेलीं पानें पाहून व एकनाथांचें सदाचरण आठवून हा अवतारी मनुष्य आहे असें ह्मणून ते आपापल्या घरीं गेले. दुसऱ्या दिवशीं ब्राह्मणांनीं एक सभा भरविली व तींत सर्वानुमतें ठरविलें कीं, एकनाथांस प्रायश्चित्तानें शुद्ध करून जातींत घ्यावें. मग 'गंगेंत स्नान घालूनि त्वरित। एकनाथांसी देती प्रायश्चित्त। भस्म गोमय लावूनि त्वरित। मंत्र वेदोक्त म्हणताती' (भक्तविजय अ० ४६–१०७) ह्या कथेचें तात्पर्य पंतांनीं दोन सुरस आर्यांत सांगितलें आहेः—

भूताराधनयज्ञीं समदर्शी एक परम हा रमला।
द्रवुनि म्हणे पित्रन्नें भोज्य जगनिंद्य पर महार मला॥१॥

दे अन्न अंत्यजा जें केलें तर्पावयासि पितरांतें।
हें साधुशील दुर्लभ लोकीं कालत्रयींही इतरांतें॥२॥

## ४ दंडवतस्वामी.

दंडवतस्वामी नांवाचे एक सत्पुरुष पैठणांस राहत. ते नमनभक्ति आचरीत असत. भूतमात्र पाहिलें कीं, भगवद्भावनेनें यांनीं दंडवत घालावें म्हणून यांस दंडवतस्वामी म्हणत. हे नाथांचे

शिष्य होते. मृत गाढवास लोटांगण घालायला कांहीं ब्राह्मणांनीं सांगितल्यावरून यांनीं तसें केलें तों चमत्कार असा झाला कीं तें गाढव उठून उमे राहिलें! ह्या सिद्धीची गावांत प्रसिद्धि होतांच लोक दंडवतस्वामीस वंदूं लागले. योगसाधनानें सिद्धि प्राप्त होतात हें खास, पण सिद्धि ह्या परमार्थाला बाधक असल्यामुळें भक्त त्यांच्या भरीस पडत नाहींत. भागवताच्या १५ व्या अध्यायांत सिद्धींचें वर्णन करून नाथांनीं म्हटलें आहे कीं, " माझें स्वरूप शुद्ध अद्वैत । तेथ सिद्धींचें जे मनोरथ । तें लोकरंजन समस्त । नाहीं परमार्थ सिद्धींमाजी ! १६६ ॥" साधकाचें मन सिद्धीवर गेलें कीं भगवत्प्राप्तीस मोठीच नागवण होते. थोडय़ाशा सिद्धि दाखविता आल्या किंवा चमत्कार करिता आले कीं मनुष्यास वाटतें कीं 'देव आतां आपल्या हातांत आला' व भोळ्या भाबडय़ा लोकांना देवाची कल्पनाही नसल्यामुळें ते अल्पस्वल्प सिद्धीला भुलून अशा लोकांनाच साधू समजून त्यांचे देव्हारे माजवितात व खऱ्या परमार्थास मुकतात. खऱ्या संतांस सिद्धि वश असतात व कार्यगौरवास्तव ते चमत्कारही करून दाखवितात; पण सिद्धींची किंमत किती आहे हें ते जाणून असतात. बहुधा ढोंगी लोकच सिद्धींचा बाजार मांडून गरीबगुरिबांस भोंदतात. सिद्धींची प्राप्ति म्हणजे परमार्थ नव्हे. असो. नाथांनीं दंडवतस्वामीस सांगितलें कीं, 'तूं गाढव उठविलेस हें वाईट झालें. यामुळें लोक तुझ्या

मागें लागतील, ज्याचे मनुष्य मरेल तो तुझ्याकडे येईल, तुला मोह पडेल, लौकिक वाढेल व परमार्थ बाजूला राहून तूं नागविला जाशील. यवन तुला नेऊन कारागृहांत ठेवतील व नसते धिंडवडे होतील. करितां कळिकाळ दारुण आहे हें जाणूत तूं आपला समाधिस्थ हो !' त्याप्रमाणें दंडवतस्वामी आसनावर बसले व त्यांनीं हरिचिंतन करीत असतांना स्वच्छंदानें देहत्याग केला! पैठणकर ब्राह्मणांस नाथांचा छळ करण्यास हा प्रसंग उत्तम सांपडला. त्या ब्राह्मणाच्या हत्येचा दोष त्यांनीं नाथांवर टाकला; तथापि नाथांची स्थिति भंग पावली नाहीं. 'निश्चयाचा मेरु अचळ। श्रीनाथ मनीं निश्चळ। प्रसन्न श्रीमुखकमळ, बुद्धि अविकळ निजस्थिति' (केशवकृत नाथचरित्र. अ० १५–३२) त्या ब्राह्मणांनीं नाथांवर कोणते आरोप केले ते पहा:—

छळछळूनि बोलती वचन। केवढें याचें धैर्य पूर्ण।
परमहंसासी पुरून। आपण निश्चित बैसला ! ॥ ३८ ॥
वेदशास्त्रीं नसतां गती। उगेंचि वर्तावें उद्धती।
वाढवूनियां महंती। नाडिलें निश्चिती जगातें ॥ ३९ ॥
नुसत्या नामाचा पाठ। सांगोनि कराविला बोभाट।
लोक केले रे कर्मभ्रष्ट। ब्राह्मण्य स्पष्ट बुडाविलें ! ॥ ४० ॥

ब्राह्मणांनींच परमहंसाच्या हत्यादोषाचा परिहार आपण होऊन सुचविला. ते म्हणाले ' पूर्वीं ज्ञानोबारायांनीं रेड्याकडून वेद बोल-

विले तसें तुम्ही ह्या पाषाणनंदीकडून कडबा भक्षण करवा, नाहीं-
तर तुम्ही महद्दोषास पात्र व्हाल.' यावर नाथ कडबा हातांत धरून
नंदीपुढें उभे राहून म्हणाले, 'प्रतिमेलाही देवपण ज्याच्या वच-
नानें येतें त्या ब्राह्मणांचें महिमान तुवां राखावें.' हें वाक्य नाथ-
मुखांतून बाहेर पडतांच नंदीनें 'जीभ काढूनि बाहेरी । वोढूनि
मुखांतरीं भक्षिला!' हें पाहून ब्राह्मण आश्चर्यचकित झाले व पर-
महंसाच्या हत्त्यारूप आरोपांतून नाथांस मुक्त केलें! नाथांच्या
आज्ञेवरून त्या नंदीनें यानंतर गंगेंत जाऊन उडी टाकली. पैठणास
दंडवतस्वामींची समाधी व नंदी दोन्हीही आज यात्रेकरूंस पाहण्यास
सांपडतात.

## ५ क्षुधित ब्राह्मणांचा सत्कार.

नाथांचें छलक परोपरीनें त्यांचा छल करीत. एकदा मध्यरा-
त्रीच्या सुमारास चार पांथस्थ ब्राह्मण गांवांत येऊन आश्रयासाठीं
कोठें जागा पाहूं लागले वाटेच्या श्रमामुळें ते फार क्षुधित झाले
होते. त्यांस या छलकांनीं सांगितलें. 'तुम्हांस उतरायला येथें
एक जागा आहे. तो समोर वाडा आहे त्यांत एकनाथ नामक
मोठा दाता राहतो. शेंकडो ब्राह्मण एकदम आले तरी तो तित-
क्यांना जेवायला घालील त्याला सिद्धि अनुकूळ आहेत. तिकडे जा.'
सात अहोरात्र पावसानें इतकी झोड उडवून दिली होती कीं, नाथांच्या
घरीं कोरडें सरपण अगदी राहिलें नव्हतें. ते पांथस्थ नाथांच्या

घरीं आले तेव्हां नाथांनीं त्यांचा सत्कार करून अगत्यपूर्वक विचार-पूस केली. ते क्षुधित आहेत, हें कळतांच नाथांनीं गिरिजाबाईस स्वयंपाकाची लौकर सिद्धता करण्यास सांगितलें. लांकडें ओलीं असल्यामुळें स्वयंपाकाला फार वेळ लागेल हें पाहतांच त्या ब्राह्मणांच्या क्षुधेनें कळकळून नाथ उद्धवास म्हणाले, 'हें आपलें घर लांकडाचेंच आहे. एक खण उखळून किलचा काढून टाक' पण माळवदाचीं लांकडें काढण्यासही वेळ लागेल हें पाहून नाथांनीं मंचकाची नवार उकलून गातें काढून फोडून दिलें व झटकन् स्वयंपाक करण्यास सांगितलें! नाथांचे अगत्य एवढें होतें कीं, एवढ्या घाईत ब्राह्मणांना थंडी वाजेल ह्मणून त्यांनीं पाणी तापवून स्नानास दिलें व गिरजाबाईनीं स्वतः स्वयंपाक करून आस्थेनें वाढलें. जेवतांना सेगडया पेटवून त्यांना ऊब यावी ह्मणून जवळ ठेवल्या. ब्राह्मण यथेच्छ जेवले व त्यांच्या संतोषानें नाथ संतोष पावले. त्या ब्राह्मणांना उभयतांच्या अगत्याबद्दल फार कौतुक वाटलें व आपल्या अपत्यांप्रमाणेंच अन्नार्थियांची तृप्ति करणारे तुह्मी धन्य आहांत' ह्मणून ते उद्गारले. जें करणें तें नाथ अंतरापासून करीत. लोकांनीं भले म्हणावे ह्मणून अतिथिसत्कार करणारे कोणी असतील, पण नाथ अतिथिसत्कार हा स्वधर्म ह्मणून निष्कामबुद्धीनेंच करीत. त्यांच्या सर्व कर्मांत व सर्वांशीं वागण्यांत कळकळ असे. 'आत्मवत्सर्वभूतानि यःपश्यति स पश्यति' या तत्त्वाप्रमाणें त्यांचें वर्तन

होतें. हीं गोष्ट क्षुल्लक नाहीं. अशी शुद्ध भावाची खरी कळकळ आपल्या वर्तनांत कितीदां दिसतें तें ज्याचें त्यानें पडताळून पहावें!

## ६ वडाऱ्यांची संभावना.

कोणत्यातरी मिषानें हरीचें नांव लोकांच्या कानावर पडावें म्हणून नाथ कित्येक दिवस कीर्तनास येणाऱ्या प्रत्येक मनुष्यास एक एक ओगराळें साखर वांटीत असत. लोभी माणसें साखरेच्या आशेनेंच कीर्तनास येत! एकदां वडारीजातीचे दोन पुरुष व एक स्त्री साखरेच्या आशेनें वाड्यांत घुसलीं व बसायला किंवा उभे रहायलाही कुठें जागा मिळेना म्हणून तशीच नाथांच्या शयनागरांत घुसली. ह्यांना कधी कीर्तन ऐकायची संवय नसल्या-मुळें झोंप लागलीं. ते दोघे पुरुष नाथांचा मंचक मऊ लागल्यामुळें त्यावर सहज कलंडले व झोंपी गेले आणि स्त्रीही त्यांच्या पाय-थ्याशींच लवंडली! कीर्तन संपल्यावर श्रोते साखर घेऊन घरोघर निघून गेले. दारें लावून नाथांचा बिछाना साफसूफ करण्यासाठीं उद्धव जेव्हां नाथांच्या शयनागारांत शिरला, तेव्हां नाथांच्या बिछा-न्यावर अस्ताव्यस्त पडलेलीं तीं माणसें त्याच्या दृष्टीस पडलीं. उद्धवानें आरडाओरड केली तों नाथ खोलींत आले व तीं माणसेंही जागीं झालीं. उद्धव संतापानें वडाऱ्यांच्या अंगावर आला तों नाथांनीं उद्धवास एकीकडे करून वडाऱ्यांस मोठ्या ममतेनें विचा-रलें "तुम्हांला नीट झोंप आली होती नां? उद्धवानें तुमची झोंपमोड

व्यर्थ केली. तुम्हांला कोणी उठवायला येणार नाहीं, व तुमच्या-वर रागावणारही नाहीं, तुम्हीं सकाळपर्यंत येथेंच स्वस्थ निजा.' हे ऐकून ते वडारी लोक ओशाळले, व नाथांच्या पायां पडले. मध्य-रात्र उलटून गेल्यामुळें नाथांनी त्यांस आपल्या वाड्यांत राहवून घेतले व दुसऱ्या दिवशीं त्यांस भोजन घालून व पुरुषांस धोतरें आणि बाईस लुगडेंचोळी देऊन रवाना केले! जातांना त्या वडाऱ्यांना नाथांबद्दल काय वाटलें असेल बरें?

## ७ गाढवास प्राणदान.

काशीची कावड घेऊन नाथ रामेश्वरास चालले होते, ते रामेश्व-राजवळ गेले तेव्हां उद्धव वगैरे मंडळी मागून येत होती, व नाथ एकटेच हरिचिंतन करीत पुढें चालले होते. इतक्यांत वाळवं-टांत एक गाढव गडबडा लोळतांना त्यांच्या दृष्टीस पडलें. नाथ त्याच्याजवळ गेले तों पाण्यावांचून तें तडफडत आहे असें नाथांस दिसलें. नाथांनीं लगेच कावडींतलें पाणी त्याच्या तोंडांत घातलें. बरेंच पाणी पोटांत गेल्यावर त्याला हुषारी आली व ते टुणकन् उडी मारून निघून गेलें. उद्धवादि मंडळी जवळ आली तेव्हां पाणी गाढवाला पाजलें गेल्यामुळें फुकट गेलें व यात्रा निष्फळ झाली असें त्यांस वाटलें. यावर नाथ हंसून म्हणाले, ' अरे वेड्यांनो! हरि सर्व प्राण्यांच्या अंतरांत आहे हें वारंवार ऐकत असून पुन्हां असें कसें बावरतां! वेळेला आठवत नसेल तर ज्ञान

काय उपयोगाचें? प्रसंगमान चुकत जाणें हें काय ज्ञानाचें सार्थक? हा मशक आणि हा गज, हा श्वपच आणि हा द्विज, ही धेनु आणि हा गाढव हा भेद काय वस्तूच्या ठिकाणीं आहे? माझी पूजा रामेश्वराला येथेंच पावली! देव सर्वगत व सद्रूप आहे. त्यावांचून रिता ठाव कोठें आहे? देहाच्या बाजूनें पाहाल तर राजाचा देह व गाढवाचा देहही सारखाच आहे, किंबहुना इंद्राचा देह आणि मुंगीचा देह सारखाच आहे. सर्वच देह नश्वर आहेत. ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्वांचेच देह नाशिवंत आहेत! देहाचा पडदा दूर सारून पाहिलें कीं सर्वांत हरिच आहे. हरीवांचून विश्वांत काय आहे? आपली दृष्टी चिन्मय झाली कीं सर्वत्र चैतन्यावांचून दुसरें कांहीं नाहीं." हें नाथांचें भाषण ऐकून उद्धवादिकांस नाथांच्या समदर्शनाचें आणखी एकवार स्मरण झालें. एका गाढवाला वेळेला पाणी मिळालें त्याचें श्रेय लक्ष ब्राह्मणभोजनाहून जास्त आहे. पंत म्हणतातः—

> पाणी एकोपंत द्रवुनि विकळ तृषित रासभा पाजी ।
> 'तें लक्षविप्रभोजनसम झालें' म्हणति साधु बापाजी ॥१॥

## ८ विष्णुसहस्रनामाचा पाठ.

नाथांच्या घराशेजारीं एक उदमी रहात होता. त्यास द्रव्यावांचून कांहीं सुचत नसे. तो कधीं देवाला जायचा नाहीं, कथा-

कीर्तनाला जायचा नाहीं, असा केवळ प्रापंचिक होता. नाथांस त्याची दया आली, व ते आपण होऊन रोज त्याच्या दुकानांत जाऊन बसूं लागले. रोज त्याला एक श्लोक लिहून द्यावा, त्याजकडून ह्मणून घ्यावा, मग दुसऱ्या श्लोकाचा पाठ द्यावा असें करितां करितां त्याला विष्णुसहस्रनाम सहज पाठ झालें. तें त्याला रोज म्हणायला सांगितलें. पुढें त्याला नाथांनीं एक आसन शिकविलें व रोज पांहटे स्नान करून आसनावर बसून त्याचें दहापाठ करण्यास सांगितलें. त्याच्या वाणीला असा संस्कार झाला कीं, मरणसमयीं तो विष्णु-सहस्रनाम घडघड म्हणाला व उद्धरून विष्णुलोकीं गेला.

## ९ एक वेश्येचा उद्धार.

पैठणास एक वेश्या होती. ती फार चतुर, सुंदर व गायन-नर्तनादि कलांत मोठी निपुण होती. नाथांच्या वाड्यांत कीर्तन-पुराणास येण्याची कोणासही मनाई नव्हती, त्याप्रमाणें तीही त्यांचें भागवतावरील पुराण ऐकावयास येत होती. तिचा धंदा वाईट होता व दुराचरण वाढविणाऱ्या धंद्याची कोणीही तरफदारी कर-णार नाहीं, तथापि हें कबूल केलें पाहिजे कीं, तिच्याही हृदयांत हरिभक्तीचा जिव्हाळा होता. नाथांच्या अमृतमय वाणीनें तिनें भाग-वतांतील आठव्या अध्यायांतील पिंगलाख्यान ऐकल्यापासून तर तिच्या चित्तवृत्तींत मोठी गडबड उडून गेली! ज्या हीनदीन पुरुषांस आपला देह आपण केवळ पैशासाठीं विकीत आलों त्यांपैकीं प्रत्येकजण

'वित्त न देववे कृपणता । काम न पुरवे पुरता । प्रीति न करवे तत्वता । भेटी मागुता तो नेदी' ह्या नाथांच्या वर्णनाला कसा जुळतो याची ती आपल्या मनाशीं चाळणा करूं लागली ! पिंगले-प्रमाणें तिच्याही मनांत वैराग्य उद्भवलें. नरदेह हा किती घाणेरा आहे याची कल्पना तिच्या मनांत भरली तों तिला ओकारीच येऊं लागली.

भीतरिलें अवकाशीं । दुर्गंधी उठली कैशी ? ।
तोचि प्रवाह अहर्निशी । नवद्वारांसी वाहती ॥२३८॥
अखंड वाहतीं मळें । देखोनि ज्याचे तो कांटाळें ॥
अहर्निशी धुतां जळें । कदा निर्मळ ते नव्हती ॥ २३९ ॥
अस्थिमांसाचा कोथळा । विष्टामूत्रांचा गोळा ॥
त्यां आलिंगिला वेळोवेळां । जळो कंटाळा नयेचि ॥२४०॥
अच्युतें ज्यासी निजसुख दिधलें । जें च्यवेना कांहीं केलें ॥
ऐसिया हृदयस्था विसरलें । आणि भुललें अकामदा ॥२४५॥

असे विचार मनांत येऊन ती वेश्या पश्चात्तापानें संपप्त झाली. आठ दिवस झाले, तिनें दार लाऊन घेतलें. तिची पूर्वरीत पालटली, अनुतापानें चित्त करपून गेलें. नाथांचें पवित्र पाय मज पापराशीच्या माडीला लागतील काय, असा विचार तिच्या मनांत घोळूं लागला. त्याप्रमाणें एक दिवस नाथ गंगेहून परत येत असतां ती माडी-वरून खालीं आली व नम्रभावानें तिनें 'आपले पाय माडीला लागतील काय ? ह्मणून विनंती केली. नाथांनीं एकदम 'हो'

म्हटलें, व तिच्या मागोमाग ते माडीवर चढले. उद्धव मागे होतेच. त्यांना वाईट वाटलें व कुटाळांना अशी संधी नाथांनीं दिली याचें दुःखही वाटलें! उद्धवही नाथांच्या मागोमाग वर गेले. तिनें रांगोळी घालून चौरंग मांडलेला होता त्यावर नाथांस बसविलें. नाथ चौरंगावर व ती दारांत सात्विक अष्टभावांनीं रोमांचित झालेली! अर्ध घटिका झाला, कोणाच्याच तोंडांतून शब्द नाहीं! ' आपल्यापुढें बसलेला महात्मा कोणीकडे व आपल्या दुराचारांची व पापांची रास कोणीकडे! असें असून हा पुण्यपुरुष आपल्या शब्दाबरोबर वर आला तेव्हां त्याची दयाशीलता केवढी ' असें मनांत येऊन ती गहिंवरली. सूर्याच्या उदयाबरोबर तम नाहींसें होतें त्याप्रमाणें नाथदर्शनाबरोबर तिच्या हृदयांतील पापवासनांचा संचय पार नाहींसा झाला. हिला खरा पश्चात्ताप झाला आहे व हरिप्रेमाचा जिव्हाळा हिच्या ठिकाणीं आहे असें पाहतांच नाथांचें चित्त द्रवलें व त्यांनीं तिला धीराचा उपदेश केला. तिच्या नेत्रांतून अश्रूंचा पूर वाहत होता व त्याबरोबर तिचें सव पाप वाहून जात होतें बीज शुद्ध पाहतांच नाथांनीं ' रामकृष्णहरी ' ह्या मंत्राचा उपदेश करून तिला सद्वर्तनाचा क्रम सांगितला. त्याप्रमाणें वागून ती वेश्या पुढील दहा वर्षांत इतकी निवळली कीं, मरणसमयीं ती कृष्णस्वरूपाचें ध्यान करीत व मुखानें ' कृष्ण कृष्ण जय कृष्ण कृष्ण ' ह्या मंत्राचा घोष करीत फार शांतपणानें मेली!

## १० चोरांचा सत्कार.

नाथांच्या वाड्यांत कीर्तन चाललें असतांना एके रात्रीं तीन चोर गर्दींत शिरले, व कथा आटोपून लोक घरोघर गेले आणि वाड्यांत निजानीज होऊन सामसूम झाली कीं, आपलें काम उरकून घ्यावें अशा बेतानें आड लपून बसले. कीर्तनसमाप्ति झाली व लोक गेल्यावर घरांतील मंडळी आपापल्या जागीं जाऊन निजली. दोन वाजायच्या सुमारास चोरांनीं आपलें कर्म आरंभिलें. कापडचोपड व कांहीं चांगलीं भांडीं जीं हाताला लागलीं तीं सर्व मागील दरवाज्यापाशीं नेऊन ठेवलीं; दार उघडून जायची तयारी करून ठेवलीं; पण लोभाविष्ट होऊन आणखी कांहीं हाताला लागले तर पहावें म्हणून हलक्या पावलानें घरभर धुंडूं लागले. धुंडतां धुंडतां ते नाथांच्या देवघरापाशीं आले तों देवघरांत एक समई मंद जळत असून नाथ आसनावर बसून समाधिसुखानुभव घेतांना त्यांस दिसले. एकाएकीं चोराचे डोळे गेले, त्यांस दिसेनासें होऊन त्यांची दिशाभूल झाली व मागलें किंवा पुढलें कोणतेंच दार सांपडेना! आंधळ्या कोशिंबरीचा खेळ खेळतां खेळतां ते भांड्यांवर अडखळून पडले, व नाथ देवघरांतून बाहेर आले. चोरांनीं नाथांस पाहिले होते, तेव्हां ह्याच सत्पुरुषाच्या प्रभावानें आपण आंधळे झालों हें जाणून त्यांनीं नाथांच्या पायांवर लोटांगण घातले व ते रडूं लागले. नाथांनीं त्यांच्या डोळ्यांवरून हात फिरविला तेव्हां त्यांस दिसूं लागलें, हें

पाहून तर चोर अगदीं दिपून गेले. नाथांच्या हस्तस्पर्शानें त्यांच्या बुद्धींतही पालट पडला. त्यांनीं आपण चोर आहोंत हें सांगितलें व दारापर्यंत नेऊन नाथांस चोरीसाठीं काढलेल्या सर्व वस्तु दाखविल्या. नाथांची समता अढळ होती. ते चोरांस म्हणाले, 'तुह्मीं फार दमला असाल, तर जेवण करा व मग हें सर्व सामान घेऊन जा. आह्मीं तुमच्या आड येणार नाहीं, मी तुम्हांस हीं ओझीं स्वतः वाहूं लागेन! तुम्ही अगदीं संकोच बाळगूं नका. चोरी करणें हा तुमचा धंदा आहे, त्याप्रमाणें तुह्मीं हीं ओझीं घेऊन जा. शांति, क्षमा, दया हा आमचा धर्म आहे व आह्मीं आमच्या धर्माप्रमाणें वागूं.' असें म्हणून नाथांनीं आपलय हातांतली आंगठी काढून तीही त्या चोरांच्या अंगावर टाकली! नाथांच्या या निष्कपट सौजन्यानें ते चोर चकित होऊन गेले व अधीकच नम्र झाले. दुष्ट लोकही सुष्टपणाच्या वागणुकीनें सुष्ट होतात. जगांतला दुर्जनपणा पुष्कळदां आपण आपल्या दुर्जनपणानें वाढवीत असतों! सौजन्यानें वागूनही दुर्जन शुद्धीवर येणार नसतील तर त्यांच्या दुर्जनपणावर ह्या मृत्युलोकांत कांहींच औषध नाहीं असें म्हणावें लागेल! पण पाण्यामध्यें खडक फोडण्याचें सामर्थ्य आहे, त्याप्रमाणें सौजन्यामध्येंही दुर्जनपणा जिंकण्याचें सामर्थ्य आहे! मात्र ह्या सौजन्याच्या सामर्थ्याचा भरंवसा संतांप्रमाणें सामान्य लोकांत नसल्यामुळें ते 'जशास तसें' हें राजसी तत्व अंमलांत

आणतात, 'जशास तसें' ह्या तत्वाप्रमाणें वागल्यानें दुर्जन जितके वश होतात त्याहून अधिक खात्रीनें ते सौजन्यानें वश झाल्याचीं उदाहरणें संतांच्या चरित्रांत आढळतात! दुर्जनांचें दुर्जनत्व तरी दुर्जनसंगतीनें उत्पन्न झालेलें व वाढलेलें असतें. मनुष्य स्वभावतः हरिरूप असून सर्व विकार मायिक आहेत. जसजसी बाहेरची उपाधि लागेल तसतसा तो भलाबुरा झालेला दिसतो. पाण्याचा सहज धर्म शीतलत्व हा असून अग्निसंयोगानें तें तापतें, पण अग्नि-संयोग काढून घेतल्यावर तें आपल्या सहज रूपाप्रत पावतें; त्याप्र-माणें वाईटपणाच्या उपाधि काढून घेतल्यावर मनुष्य स्वभावतः निर्मळ सच्चिदानंदरूपच आहे. ईश्वर सर्वभूतांच्या हृदयांत आहे ही प्रतीती संतांस असते, म्हणजे ते चिद्रूपत्व तेवढें घेतात व बाकीचे गुणदोष प्रकृतीचे प्रकृतीला देतात! ह्या चिद्रूपावर नित्य आरूढ झाल्यामुळें शांति, समता, निरहंकार इत्यादि गुण संतांच्या ठिकाणीं सहज असतात. असो. ह्या तत्वानुसार नाथांच्या सौजन्यानें ते चोर वळले. नाथांनीं गिरिजाबाईस व उद्धवास उठ-वून पाक सिद्ध करविला व त्या चोरांस जेवूं घातलें. चोरांनीं आपल्याबरोबर कांहींएक नेलें नाहीं. फक्त नाथांच्या उदारपणाचें स्मरण तेवढें बरोबर नेलें व त्या स्मरणानें शुद्ध होऊन ते चौर्यकर्मा-पासून निवृत्त झाले व सदाचरणानें वागून व पुढें वारंवार नाथांची कीर्तनें ऐकून सद्गुतीला पावले! नाथांच्या एकरात्र संगतीनें चोर

होते ते साव झाले. वरील कथेसंबंधानें पंताच्या आर्या आहेत त्याः—

भोजन दे चोराला, आदर आग्रह स्वयें करी मोठा ।
साधु प्रसन्नचित्तें बांधुनि लागे वहावया मोटा ! ॥ १ ॥
रीति न कोणाचीही या अतितर, सरळ रीतिशीं तुकली ।
साधु म्हणे, 'तस्करहो घ्या तुमची एक आंगठी चुकली' ॥२॥

## ११ राण्या महार व त्याची बायको.

राण्या ऊर्फ विवेकनाक महार नांवाचा एक महार पैठणास राहत असे. तो फार भाविक व शुद्धाचरणी होता. त्याची बायकोही त्याच्याचसारखी सुशील होती. नवराबायको दोघेही नाथांच्या कीर्तनपुराणास नित्य येत असत, व बाहेर बसून नामघोष करीत. नाथ गंगास्नानास जाण्यापूर्वीं रस्ता झाडून साफ करण्याचें काम राण्या व त्याची बायको आळीपाळीनें करीत असत. एके दिवशीं नाथांच्या ज्ञानेश्वरीच्या पुराणांत विश्वरूपदर्शनाचा अध्याय निघाला होता. पुराण संपल्यावर राण्यानें नाथांस विचारलें, 'महाराज ! श्रीकृष्ण जेव्हां विश्वरूपाने नटले तेव्हां हा राण्या कोठें होता ?' नाथांनीं यावर तत्काळ उत्तर केलें, 'तूंही कृष्णरूपींच होतास.' यावर राण्या व त्याची बायको यांनीं घरीं विचार केला कीं सर्व विश्वांत जरी हरीच संचला आहे तर आपण देहानें महार असलों तरी आपल्याही हृदयांत हरी आहेच. कांहीं दिवस गेल्यावर त्या

नवराबायकोंनीं मनांत विचार केला कीं, नाथांस आपल्या घरीं जेवायला बोलवावें व त्यांच्या समागमाचा लाभ जोडून धन्य व्हावें. राण्या व त्याची बायको इतर महारांपेक्षां फार स्वच्छतेनें राहत, अमंगळ पदार्थाला शिवत नसत, वाईटसाईट तर कांहींएक खात नसत. मुखानें विठ्ठलनामाचा साद घालीत तीं आपल्या कामांत दक्ष असत. देह महाराचा, बाकी आचरण सर्व ब्राह्मणांचें. त्यांचे जातभाई त्यांस थट्टेनें आपल्यांतला ब्राह्मणच समजत, आणि शुद्धाचरण व भगवद्भक्ति या गुणांत तर ते लाखो ब्राह्मणांहूनही फारच श्रेष्ठ होते. त्यांनीं नाथांस फार सद्भावानें जेवावयास बोलावले व नाथांनींही तें कबूल केलें. ही गोष्ट गांवांत कळतांच ब्राह्मणांनीं एकच कल्होळ मांडला; तेव्हां नाथांनींही त्यांस 'त्याचें अनामिकपणाचें ज्ञान । मज तंव न दिसे ओळखण । दिसतो आत्मत्वें परिपूर्ण । सर्वांसमान सारिखा ' ( केशवकृत नाथचरित्र अ० १७–२६ ) असें उत्तर दिलें! नाथ त्या महाराच्या घरीं जेवायला कसे जातात ते पाहण्यासाठीं ब्राह्मण नाथांच्या घरापासून तो महारवाड्यापर्यंत अंतराअंतरानें सारखे टपून बसले. नाथ प्रसिद्धपणें घराबाहेर पडले, राण्यांनीं सपत्नीक त्यांची पूजा केली, रांगोळ्या घालून त्यांना पानावर बसविलें, आग्रह करून पक्वान्नें वाढलीं व ते जेवले! पण इतक्यांत एक चमत्कार झाला. तो हाः—नाथ एकाच वेळीं आपल्या घरीं आणि राण्याच्या घरीं

सारख्या रूपांत व सारख्या वेषांत अनेकां... ...
एकच एकनाथ एकसमयावच्छेदेंकरून आपल्या वाड्यांत भागव
वर पुराण सांगत आहेत व राण्यामहाराच्याही घरीं जेवत आहेत
असें त्या ब्राह्मणांनीं पाहिले तेव्हां त्यांस फार आचंबा वाटला व या
दोहोंपैकीं खरे एकनाथ कोणते हें त्यांस कळेनासे झाले ! तेव्हां
राण्याचा सद्भाव जाणून पांडुरगानेंच राण्याच्या घरीं नाथवेषानें
जाऊन भोजन केलें असें ह्या गोष्टीचें तात्पर्य लोकांनीं काढलें. पंत
ही गोष्ट पुढील आर्येंत सांगतात.—

आवडि कळतां एकोपंताचें रूप घेउनि स्वामी ।
हा चोरुयामेळ्याच्या आपण जाऊनि जेवला धामीं ॥ १॥

## १२ ब्राह्मण आणि परीस.

पैठणास एका ब्राह्मणाजवळ एक परीस होता. त्यास तो जीवा-
पलीकडे जपत असे. त्याला एकदा यात्रेनिमित्त दूर जायचें होतें
म्हणून एकनाथ हे पूर्णभक्त असा विश्वास बाळगून त्यानें तो परीस
नाथांजवळ ठेवायला दिला. नाथांनीं तो देव्हाऱ्याखालीं ठेवून
दिला. एक दिवस उद्धवांनीं गंगेंत निर्माल्य नेऊन टाकलें त्यांत तो
कोठें गेला ! दीड वर्षांनीं तो ब्राह्मण परत आला तेव्हां
आपला परीस नाथांजवळ मागूं लागला. नाथांना त्या परिसाची
आठवणही नव्हती ! नाथांनीं देव्हाऱ्याखालीं शोधावयास उद्धवास

सांगितलें तों तो कोठें सांपडणार ! निर्माल्याबरोबर तो केव्हांच गंगेंत जाऊन पडला असेल असें उद्धवानें सांगितलें. त्या ब्राह्मणाला वाटलें कीं नाथांची यांत कांहीं तरी लबाडी असावी. त्याला परिसाची जी किंमत वाटत होती तीच नाथांनाही वाटत असावी असा त्यानें तर्क केला! प्रत्येकजण आपल्यावरून दुसऱ्याची परीक्षा करीत असतो. त्या बिचाऱ्या धनलोभी प्रापंचिकास "हरिचरणीं अपरोक्षस्थिति। तेथील क्षणार्धाची जे प्राप्ती। त्यापुढें त्रिभुवनविभवसंपत्ती। भक्त मानिती तृणप्राय" ( नाथ भागवत अ० २--७४७ ) ह्या नाथांच्या उच्चतम मनोवृत्तीची ओळख कोठून होणार? असो. नाथांनीं त्या ब्राह्मणास गंगेवर नेले, व गंगेंत जाऊन बुडी मारिली व दोनी हातांत मावले तितके दगड घेऊन हात वर करून ते म्हणाले 'घे तुझा परीस यांतून निवडून!' ब्राह्मणानें खिशांतला लोहगोळ काढून पाहिला तों सर्वच परीस आहेत असें त्यांस आढळून आलें. नाथांनीं त्यास त्यापैकीं एक देऊन बाकीचे गंगेंत टाकून दिलें. ज्या महात्म्याच्या हस्तस्पर्शाबरोबर जीवाचे ब्रह्म होतें त्याला सोन्यामोत्यांचा लोभ कोठून असणार? ओहोळाला पावसाची मातबरी वाटणें साहजिक आहे, पण त्याची समुद्राच्या ठिकाणीं खबरही नसतें!

## १३ अंत्यज्याचें पोर व कुष्टी ब्राह्मण.

एके दिवशीं नाथ मध्यान्हसंध्येला गंगेवर चालले होते.

वाटेंत एक महाराचें पोर आईच्या मागें धांवत असतां आई झर्कन पाण्याला पुढें गेल्यामुळें तें मागें अडखळून पडलें. वाळवंट सूर्याच्या प्रखर किरणांनीं तापलें होतें, पोराच्या तोंडांतून लाळ व नाकांतून शेंबूड गळत होता. पोराला धड वेगानें धांववेना, व आई पुढें दिसत असल्यामुळें मोहांत सांपडल्यानें मागेंही वळवेना. अशा पेंचांत सांपड-लेलें व कडक उन्हानें हैराण झालेलें तें पोर पाहतांच नाथांचें अंतःकरण कळवळलें. त्यांनीं चटकन् त्या पोराला उचलून कडेवर घेतलें, त्याचें नाकतोंड पुसलें व त्याला धोतराखालीं झांकून घेऊन ते महारवडयांत गेले. तेथें जातांच त्या पोरानें आपलें घर ओळखलें. त्याच्या घरांतून त्याचा बाप धांवत आला, इतक्यांत आईही घागर घेऊन आली. नाथांनीं तें मूल त्यांच्या स्वाधीन केलें व पोराबाळांना नीट जपायला सांगून आपण गंगेवर गेले. स्नानसंध्या आटोपून घरीं गेले व नित्यक्रमाला लागले. कांहीं दिवस गेल्यावर पैठणांत एक त्र्यंबकेश्वरचा कुष्टरोगानें जर्जर झालेला वृद्ध ब्राह्मण आला व तो एकनाथांचें घर विचारीत नाथांच्या घरांत शिरला. ती मध्यान्ह-काळची वेळ असल्यामुळें नाथ काकबळी टाकावयास बाहेर आले, तों सदर दुःखीकष्टी झालेला ब्राह्मण जवळ आला व त्यानें आपली कहाणी सांगण्यास आरंभ केला. आपण कोठील कोण हें सांगून तो म्हणाला: ‘मी त्र्यंबकेश्वरास माझें कोड जावें म्हणून अनुष्ठान केलें. आठ दिवसांमागें मला शंकरांनीं दृष्टांत दिला कीं, तूं पैठणास जा व

तेथें एकनाथाच्या घरीं जाऊन त्यानें उन्हांत कळवळून महाराच्या पोराचे प्राण वांचविलें, ह्या गोष्टीची त्यास आठवण दे. ह्या परोपकाराचें पुण्य जर त्यानें तुझ्या हातावर टाकलें तर तूं रोग-मुक्त होशील!' ही गोष्ट सांगून तो ब्राह्मण रडूं लागला व त्यानें नाथांच्या पायांवर लोळण घेतलें. नाथांनीं त्र्यंबकेश्वराच्या ब्राह्म-णाची गोष्ट ऐकली व म्हणाले "मला पापही नाहीं व पुण्यही नाहीं. पुण्योद्भव केव्हां झाला तें एका त्र्यंबक-देवालाच माहीत! आजन्म केलेल्या सुकृताचें उदक तुझ्या हातावर मी सोडतों" असें म्हणून नाथांनीं पंचपात्री हातीं घेतली. तेव्हां त्या ब्राह्मणानें नको म्हणून नाथांस निवारिले. 'त्र्यंबक-देवाची आज्ञा झाली तेवढेंच पुण्य मला द्या' ह्या ब्राह्मणवचना-नंतर नाथांनीं त्याच्या वचनाप्रमाणें उदक त्याच्या हातावर सोडलें तों त्या ब्राह्मणाचा रोग जाऊन त्याची काया निर्मळ झाली! चार-आठ दिवस नाथांच्या आतिथ्याचा लाभ घेऊन नाथांचे लोकोत्तर गुण गात तो ब्राह्मण त्र्यंबकेश्वरास गेला. अंत्यजतोकाची (पोराची) कथा पंतांनीं पुढील आर्येंत सांगितली आहे:—

अंत्यजतोक कडे घे उष्णीं ज्या फार लाळशेंबुड तें ।
अद्भुत सुकृत न गातां साधूंची रीति आळसें बुडते ॥ १ ॥

### १४ महार आणि ब्रह्मराक्षस.

पैठणास एक महार चोऱ्या करून आपली उपजीविका करीत

असे. एका चोरींत तो सांपडला व अधिकाऱ्यांनीं त्याच्या पायांत शृंखळा घालून त्याला कैदेंत टाकलें. कैदेंत असतांना त्याला खायला मिळेना. देहाला फार क्लेश झाले, डोकींवर केंस वाढले, त्यांत खंडीभर उवा झाल्या, सर्वांग विकळ झालें व डोळयांत प्राण येऊन राहिले ! अशा स्थितींत त्याच्या पायांतल्या शृंखळा काढून घेण्यांत आल्या व तो दुबळा प्राणी अंगणांत कित्येक दिवस लोळत पडला होता. एके रात्रीं नाथांच्या कीर्तनाचा घोष त्याच्या कानांत पडल्यावर आपली सुटका करून घेण्याची कल्पना त्याच्या डोक्यांत आली. तो हळू हळू खुरडत खुरडत नाथांच्या द्वारीं येऊन पडला. नाथांच्या कानीं त्याचें विव्हळणें पडल्यावर नाथ बाहेर आले तों त्यांच्या दृष्टीस तो महार पडला. त्याच्या तोंडांतून शब्द उमटत नव्हता तरी पोटांत कांहीं नाहीं असें त्यानें संज्ञेनें सुचविलें. नाथांनीं खीर तयार करवून त्याच्या तोंडांत घातली. त्याला अंथरापांघरायाला वस्त्रें देऊन उबाऱ्याची जागा निजायला दाखवून दिली व त्याला सुखाची झोंप लागलीसें पाहून आपण आपल्या शयनागारांत गेले. दुसऱ्या दिवशीं सदर चोर सुटून आल्याचें नाथांनीं अधिकाऱ्यांस कळविलें व आपल्या येथें औषधपाण्यासाठीं त्याला राहूं देण्याची त्यांस विनंती केली. ‘ औषधावांचून खोकला गेला ’ म्हणून अधिकाऱ्यांनीं त्यांचें म्हणणें मान्य करून त्या चोराची उरलेली शिक्षा माफ केली. तीन महिने

नाथांच्या घरची शुश्रूषा घेतल्यावर तो महार पहिल्यासारखा खड-खडीत झाला. नाथांच्या अन्नानें त्याच्या मलिन वासना पार धुवून गेल्या. नाथांनीं त्याला पुनर्जन्मच दिला म्हटलें तरी चालेल. नाथांच्या विषयीं पराकाष्ठेचा पूज्यभाव त्याच्या मनांत उत्पन्न झाला. त्यानें पूर्वींचा कुमार्ग सोडला व तो नाथांच्या कृपेनें विठ्ठलोपासक झाला. ह्या गोष्टीला कांहीं दिवस लोटल्यावर एकेदिवशीं नाथ गंगेच्या वाटेवरील एका अश्वत्थवृक्षाखालून जात असतां वृक्षावरील ब्रह्मराक्षस खालीं उतरून नाथांसमोर उभा राहिला. ' आपण आज-पर्यंत जें ब्राह्मणभोजन घातलेंत त्याचें किंवा तुरुंगांतून निसटून आलेल्या महाराची शुश्रुषा केल्याचें या दोहोंपैकीं कोणतें तरी पुण्य मला द्या म्हणजे मी ह्या यातनेंतून सुटेन ' अशी त्यानें नाथांची प्रार्थना केली. पाप व पुण्य हीं दोन्ही सकाम कर्मांपासून उत्पन्न होत असल्यामुळें व नाथांचें कायिक, वाचिक, मान-सिक सर्वच कर्म निष्कामपणानें होत असल्यामुळें पापपुण्यांचा त्यांना हिशेब नव्हता. पुण्यपाप स्वर्गनरकदायक आहेत म्हणून दोन्हींना डावलून संत नैष्कर्म्यबोधानें निजमोक्ष पावतात. अखंड स्वस्वरूपानंद हेंच त्याचें स्वरूप असतें. नाथांनीं अंत्यजमुक्त-तेच्या पुण्यावर उदक सोडून त्या ब्रह्मराक्षसाला मुक्त केलें.



# ९ नाथ आणि श्रीखंड्या.

तया संगाचेनि सुरवाडें। मज विदेहा देह धरणें घडे ॥
किंबहुना आवडे। निरुपम ॥

ज्ञानेश्वरी अ० १२-२२५

१ ज्ञानी भक्त. २ श्रीखंड्या ब्राह्मण. ३ श्रीखंड्यानें केलेली नाथांची सेवा. ४ द्वारकेचा ब्राह्मण, श्रीखंड्या व नाथ. ५ ह्या गोष्टीस भरपूर प्रमाणें.

१ नाथांची भगवत्सेवा इतकी निरुपम झाली कीं भगवंतांनीं त्यांच्या संगसुखाच्या आवडीनें त्यांच्या घरीं बारा वर्षें राहून त्यांची सेवा केली! 'वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः' ह्या गीतावचनाप्रमाणें सर्वत्र सर्वकाळ परमात्म्याला पाहणाऱ्या दुर्लभ महात्म्याच्या कोटीस नाथ पोंहचले, तेव्हां त्यांच्या घरीं ब्राह्मण-रूपानें देव येऊन राहिले. भक्तानें देवाची इतकी उत्कट सेवा केली कीं देवालाच उलट भक्ताची सेवा करावीशी वाटली! भक्त होता तो देवकोटीला पोंहचला तेव्हां देव भक्त होऊन अव-तरले! भक्तपणाचा उत्कर्ष ह्मणजे देवपणा व देवपणाचा उत्कर्ष ह्मणजे भक्तपणा. देव तोच भक्त व भक्त तोच देव. परमभक्त पाहिला कीं देवाला आपले देवपणही टाकावेसें वाटतें. आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी भक्तांहून ज्ञानीभक्त कोटपटीनें श्रेष्ठ होय. 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' म्हणजे अखंड माझ्या

ठायीं समरस झालेला अभेदभक्त माझा आत्मा आहे, मीच तो आहे असें भगवंतांनीं स्वतः सांगितलें आहे. 'प्रियो हि ज्ञानिनोत्यर्थमहं स च मम प्रियः' ज्ञानीभक्ताच्या परमप्रेमाचें स्थान देव व देवाच्या परमप्रेमाचें स्थान भक्त, असे ते एकमेकांच्या ठायीं आहेत. भक्ताला देवावांचून कांहीं आवडत नाहीं व देवालाही भक्तांवांचून कांहीं आवडत नाहीं. भक्ताचें सर्वस्व देव आणि देवाचें सर्वस्व भक्त.

२'भक्तिमान् मे प्रियो नरः' (गीता अ १२–१९) ह्या देवाच्या उक्तीचें मर्म ज्ञानेश्वर महाराजांनीं येणेंप्रमाणें सांगितलें आहेः "चौथी पुरुषार्थसिद्धि म्हणजे सायुज्यमोक्ष आपल्या हातीं घेऊन जो जगाला देत भक्तिपंथीं निघाला त्याला पाहण्याचें मला डोहळे होतात, तेव्हां मी अचक्षु असून डोळस होतो, त्याचें आलिंगनसुख भोगण्यासाठीं दोंवर दोन भुजा घेऊन म्हणजे चतुर्भुज होऊन येतो, त्याच्या गुणाचीं लेणीं आपल्या वाणीवर व त्याच्या कीर्तीचीं भूषणें आपल्या कानावर घालतों, आपल्या हातांतल्या कमळानें त्याला पूजतो, त्याला आपल्या माथां मुकुट करतों व त्याची टांच हृदयीं धरितों !" ह्या अभिप्रायाप्रमाणें नाथांच्या लोकोत्तर भक्तीला भुलून भगवान् श्रीकृष्ण ब्राह्मणवेषानें एकदां नाथांच्या घरीं आले व त्यांना नमस्कार करून पुढें उभे राहिले. त्यांचा संवाद झाला तो असाः—

नाथः—आपण कां आला ?

**ब्राह्मणः**—आपली कीर्ति ऐकून आपला अखंड समागम व्हावा व आपली सेवा घडावी म्हणून मी आलों आहे. मी जन्मापासून संतांचें दास्यच करीत आलों आहे मला वेतन नको. पोटभर अन्न व आपली सेवा मिळाली म्हणजे पुरें.

**नाथः**—तुमचा कुटुंबपरिवार काय आहे ?

**ब्राह्मणः**—माझा मीच एकटा आहे. मला दारापुत्र कोणी नाहींत. ह्या देहाला कृष्ण किंवा श्रीखंड्या म्हणतात.

**नाथः**—तुमच्या सेवेची अम्हांला कांहीं गरज नाहीं. तथापि तुम्हीं अन्नवस्त्रसेवून येथें परमार्थसाधन करीत खुशाल रहा.

**ब्राह्मणः**—एवढी एक कृपा असावी. स्वकष्टार्जित अन्न सेवून राहण्याची ह्या दासाला परवानगी असावी. माझी सेवा आपण मान्य करून घ्यावीच.

३ ह्या नंतर श्रीखंड्या नाथांच्या घरीं राहिला. त्यानें आपल्या अनंत गुणांनीं सर्वांस मोहून टाकलें. हरीची लीला अशी अतर्क्य आहे कीं, सर्वांभूतीं भगवंत पाहणाऱ्या नाथांनाही त्याच्या खऱ्या रूपाची ओळख पटली नाहीं!! भगवंतांनीं आपल्या मायेचें पटल मध्यें केलें, एरवी नाथासारख्या भक्तोत्तमानें पळभरही देवाची सेवा घेतली नसती; पण देवाला नाथसेवेची आवड म्हणून नाथांसारख्या पूर्ण पुरुषालाही त्याला ओळखतां आलें नाहीं. श्रीकृष्णानें यशोदेला चतुर्दशभुवनें आपल्या मुखांत दाखविलीं तरी

तिचा पुत्रभाव गेला नाहीं त्यांतलाच हा प्रकार झाला. देवानें कावडीनें नाथांच्या घरचा रांजण रोज पाण्यानें भरावा, देवपूजेसाठीं गंध उगाळावें, ब्राह्मणभोजनानंतर उष्टया पत्रावळी काढाव्या, व नाथांना फार फार जपावें. धर्मराजाच्या राजसूय—यज्ञापासून ब्राह्मणांच्या उष्टया पत्रावळी काढण्याचें तर त्याला व्यसनच लागलेलें होतें ! ज्याच्या चरणापासून भागिरथी प्रकट झाली तो नाथांच्या घरीं पूजेसाठीं अग्रोदक भरून ठेवी ! ज्याच्या प्राप्तीसाठीं हजारों तपी लांकडे झाले तो नाथांच्या घरीं गंध उगाळीत बसे ! ज्याची कीर्ति वाखाणतां ‘ नेति नेति ’ म्हणून श्रुतींनीं हात टेकले तो नाथांच्या गुणवर्णनीं भाट झाला ! ज्याच्या पदरजासाठीं भर्तृहरिसारख्यांनीं राज्यावर लाथ मारली तो नाथांचें चरणसंवाहन करी ! चंद्रसूर्य ज्याच्या प्रकाशानें प्रकाशमान झाले आहेत तो नाथांच्या घरीं दिव्यांच्या वाती सरसावी ! इंद्रादिदेव ज्याचे आज्ञाधारक तो नाथांच्या आज्ञेची वाट पाहत त्यांच्या द्वारीं खडा उभा असे ! ज्याच्या स्मरणाबरोबर योगी विमलाशय होतात, तो नाथांच्या घरीं उपकरणीं उटी ! लक्ष्मी ज्याच्या पायातळीं पडून आहे तो नाथभार्येच्या पायातळीं बसे ! सर्व देव ज्याच्या आज्ञेनें विश्वाचा कारभार पाहतात तो गिरिजाबाईच्या कारभारांतलीं लहानसहान कामेंही आवडीनें करी ! धन्य ते एकनाथ कीं ज्यांच्या भक्तिभावाला भुलून देव त्यांचे हडपी झाले.

नाथांच्या घरीं श्रीखडं—दिव्यचंदन—उगाळून त्यांनीं आपलें 'श्रीखंड्या' हें नांव सार्थ केलें. देव आपले सकळ ऐश्वर्य विसरून नाथांच्या सेवेंत बारा वर्षे राबले. भूतदया ज्यांच्या रोमरोमांतून व्यक्त होत होती त्या नाथांच्या घरीं तो भूतभावन—भूतेश अंगेजणीनें सेवा करिता झाला. नाथांचा योगक्षेम देवानें चालविला यांत कांहीं आश्चर्य वाटायला नको! नाथांच्या उत्सवांत गंगेच्या पाण्यानें भरून नेलेलीं भांडीं तुपानें भरलेलीं निघालीं याचेंही कौतुक वाटायला नको! नाथांच्या घरीं आचांडाल सर्वभूतांना अन्नदान व ब्रह्मदान सतत ३०।३५ वर्षे चाललें होतें. नाथांच्या दारांतून कोणीही अतिथि विन्मुख गेला नाहीं. त्यांनीं सहस्रावधि जीव भक्तिपंथाला लावले. अन्न देऊन त्यांच्या शरीराचें व ब्रह्मज्ञान देऊन बुद्धीचें पोषण केलें. थोर थोर राजांनांहीं दुष्प्राप्य असें दातृत्वाचें यश त्यांनीं संपादिलें. हरीचें सख्य जोडल्यामुळें व हरि त्यांच्या घरीं सेवकासारखा राबत असल्यामुळें त्यांना 'दीनांचा कल्पवृक्ष' ही पदवी मिळाली. देवाची सेवा करणारे भक्त कोट्यवधि आहेत, पण देव ज्याची सेवा करून स्वतःस धन्य मानतात असा भक्त म्हणजे भक्तमणिगणांचा चक्रवर्तिच होय! येथें नाथांच्या पुण्याईची शिकस्त झाली व भक्तिपंथाच्या कर्तृत्वाचा कळस झाला.

४ याप्रमाणें बारा वर्षे लोटलीं, तेव्हां भगवंतानें स्वतः गुप्त होऊन भक्तयश प्रगट करण्याचा संकल्प केला. त्या सत्यसंकल्प

दयानिधि व भक्तवत्सल देवाला नाथांची रहाणी पाहून फार समाधान झालें. आंतबाहेर एक असा तो भक्त सोडून देवाला दूर जाववेना; तथापि भाविक जनांच्या उद्धारासाठीं देवाला भक्ताचें यश वाढवायचें असतें. तिकडे द्वारकेस एक ब्राह्मण अनुष्ठान करीत होता.

आहारनेम अनुष्ठान । मुखें स्मरे 'कृष्णकृष्ण' ।
हरिच्छंदें परिपूर्ण । निजध्यास ब्राह्मणा ॥ २५ ॥
एकाग्र करूनिया मन । आणि शीतउष्ण साहून ।
हृदयीं धरितां भगवान् । जगज्जीवन कळवळला ॥ २६ ॥

—मुक्तेश्वर.

त्या ब्राह्मणाला दृष्टांत झाला कीं, "मी पैठणास एकनाथाच्या घरीं आहे. त्याच्या सेवेनें त्यावर प्रसन्न झालों आहे. तेथें मी 'श्रीखंड्या' हें नांव घेऊन राहिलों आहे. तेथें जा ह्मणजे तुला माझें दर्शन होईल." ह्या दृष्टांताप्रमाणें तो ब्राह्मण पैठणास येतांच त्याला प्रथम गोदेचें दर्शन झालें. तिच्या निर्मलोदकानें हस्तपादनेत्रादि पावन करून तो नाथांच्या वाड्याचा शोध करीत गांवांत शिरला. त्यानें पहिला मनुष्य पाहिला तो खांद्यावर कावड घेऊन जाणारा श्रीखंड्याच! तो सद्गदितांतःकरणानें नाथांच्या वाड्यांत शिरला व नाथ देवघरांत बसले होते तिकडे तडक गेला. देवासाठीं आलेला तो ब्राह्मण क्षणभर देवाला विसरून भक्ताला पाहतांच

तन्मय झाला ! सात्विक अष्टभाव त्याच्या देहावर उमटले व त्याच्या नेत्रांतून अश्रूंचे पाट वाहिले. ' महाराज, मला श्रीकृष्ण भेटवा ' असे शब्द त्यानें स्फुंदतां स्फुंदतां उच्चारिलें. त्याची ती अवस्था पाहून नाथ म्हणाले: " कृष्ण तर सर्वत्र भरला आहे. तो भूतांच्या आंत बाहेर व्यापून राहिला आहे. जेथल्या तेथेंच पहा म्हणजे तो भेटेल. तो आहे तेथेंच आहे. त्याला वेगळेपणानें कसचा पाहतोस ? दृश्य, दर्शन, द्रष्टा ओलांडून पहा. तूंच कृष्ण आहेस." हें ऐकतांच तो ब्राह्मण आवेशानें म्हणाला. ' हें ब्रह्मज्ञान मला नको. प्रत्यक्ष दर्शन येथें होईल असा मला दृष्टांत झाला आहे. श्रीखंडचा कोठें आहे ! त्याला भेटवा.' हें ऐकतांच नाथ मनांत दचकले व उद्धवप्रभृति सर्व मंडळी श्रीखंडचा-च्या शोधार्थ चहूंकडे धांवली ? श्रीखंड्याचा पत्ता नाहीं ! नाथां-च्या लक्षांत सर्व प्रकार आला व ते सद्गदित झाले. श्रीकृष्ण परमात्म्याला मी आज बारा वर्षे राबविलें हें लक्षांत येतांच त्यांच्या कोमल मनाला फार दुःख झालें. देवाला आपण केवढा शीण दिला, सांगूं नये तीं कामें सांगितलीं याबद्दल नाथांना व गिरजा-बाईला अनावर रडूं कोसळलें, व त्यांनीं देवाचा धांवा केला. त्या-वेळीं चतुर्भुज श्रीकृष्णमूर्ति साक्षात् प्रगट झाली व नाथांस व त्या तपस्व्यास पूर्ण आनंद झाला. ही कथा हां हां ह्मणतां सर्वत्र फांकली व नाथांच्या दर्शनार्थ हजारो लोक धांवले. श्रीखंड्या

पाण्यानें भरीत असलेला तो रांजण अद्याप नाथांच्या वाड्यांत आहे व त्यांत षष्ठीच्या दिवशीं हजारो घागरी पाणी जरी लोकांनीं घातलें तरी देवाची घागर येऊन पडल्याशिवाय तो रांजण भरून येत नाहीं व ती घागर येतांच तो भरून वाहूं लागतो अशी प्रसिद्धी आहे, व अनुभवही आहे.

५ देवांनीं 'एकनाथां घरिं पाणि वाहिलें गंगेच्या कावडी' ही गोष्ट आजपर्यंत अनेक संतांनीं व कवींनीं वर्णन करून प्रेमभावानें सांगितली आहे. सगुण साक्षात्काराचा ज्यांना अनुभव आहे किंवा जे स्वभावतः श्रद्धावंत आहेत अशांना तिच्या खरेपणाबद्दल शंकाच वाटत नाहीं. पण जे अभाविक व तर्कानें देवाला जाणूं पाहणारे असतील त्यांनीं पुढील प्रमाणांचा विचार करून मग आपलें मत बनवावें. थोरांचीं वचनेंही प्रमाण न मानण्याइतका अहंभावाचा जोर ज्यांच्या ठिकाणीं असेल त्यांना आमचें कांहीं एक म्हणणें नाहीं. महिपतबावांनीं ही गोष्ट भक्तविजय व संतलीलामृत ह्या दोन्ही ग्रंथांत दिली आहे. ही केशवकृत नाथचरित्रांतही वर्णिली आहे. निळोबारायांनीं नाथांच्या आरतींत 'कावडीनें पाणी ज्या घरीं चक्रपाणि वाहे। अनन्यभक्तिभावें निळा वंदी त्याचे पाये' ह्मणून ह्मटलें आहे. अमृतरायांनीं 'ब्रह्म पाहिलें रे' ह्या सुंदर पदांतः—

एकनाथाच्या भक्तीसाठीं धांउनि आला तो जगजेठी ।
खांदि कावडी घेऊनि प्रेमें । पाणि वाहिलें रे ॥ २ ॥

असें ह्मटलें आहे. रंगनाथ स्वामींनीं:—

वैकुंठीचें ब्रह्म सगुण । येऊनि सेवा करी आपण ।
ह्मणवी श्रीखंड्या ब्राह्मण । एकनाथनिजगेहीं ॥ १ ॥

असें ह्मटलें आहे. खुद्द नाथांचे समकालिन संत दासोपंत यांनीं एका पदांतः—

आवडिनें कावडिनें सांवडिल्या पत्रावळी ।
गंधचंदनासि घांसि नंदनंदन राबविलारे ॥ २ ॥

असें सांगितलें आहे. नाथांचे नातु मुक्तेश्वर यांनीं नाथांवरील आरत्यांत व पदांत ही गोष्ट सांगितली असून शिवाय 'श्रीखंड्या-ख्यान' ह्मणून ९४ ओव्यांचें एक स्वतंत्र प्रकरणच लिहिलें आहे ! नाथांचा सहवास दासोपंतांना पुष्कळ झाला होता व मुक्तेश्वरांचें बाळपण नाथांच्या घरीं त्यांच्या संगतींत गेलें होतें. हे पुरावे सामान्य नाहींतच, पण नाथांचे स्वदस्तुरचे दोन पुरावे मी आतां दाखल करीत आहे. त्यांचा नीट विचार करावा. नाथांनीं 'रुक्मिणी स्वयंवर' नामक आपल्या लोकप्रिय ग्रंथाच्या १६ व्या प्रसंगांत श्रीकृष्णविवाहानंतर वंशपात्रदान झालें त्याचें वर्णन करितांना म्हटलें आहे:—

पूर्वी पितामहाचा पिता । तयासी प्रसन्न सुभानु होता ।
तेणें भानुदासा वंश सरता । केला तत्वता हरिचरणीं १६२
प्र्ऱ्हादाचे कृपेसाठीं । बळीचें द्वार राखी जगजेठी ।
तैशीच हेही आहे गोठी । कृपादृष्टी कृष्णाची ! ॥ १६३ ॥

ह्या ओव्यांतील दुसऱ्या ओवींत वरील कथेचा स्पष्ट उल्लेख आहे असें मला वाटतें. प्र्ऱ्हादाचा नातु बळी व भानुदासाचा पणतु एकनाथ एवढा फरक लक्षांत ठेवला ह्मणजे झालें. प्र्ऱ्हादाची पुण्याई थोर ह्मणून त्याच्या नातवाचें द्वार राखणारा परमात्मा भानुदासाच्या भक्तीसाठीं त्याच्या पणताचें दार राखीत आहे असें नाथांचें येथें सांगणें आहे. याहीपेक्षां स्पष्ट पुरावा नाथांच्या अभंगांतही आहे. 'गाथापंचका' पैकी नाथांच्या गाथ्यांतील (पृ.३५०) पुढील अभंग पहा:—

१८४७.

तुह्मीं करूनियां सेवा । वाढवीलें मज नांवा ॥ १ ॥
ऐसा कृपाळु उदार । पांडुरंगा तूं निर्धार ॥ २ ॥
नानापरी उपचार । नित्य पुरवा अपार ॥ ३ ॥
उतराई नोहे देखा । ह्मणे जनार्दनी एका ॥ ४ ॥

१८४८.

पूजा उपचार । मज पुरविले अपार ॥ १ ॥
कळूं दिली नाहीं मात । अपराधी मी पतित ॥ २ ॥

जडजीवां उद्धरिलें । एकाजनार्दनीं ऐसें केलें ॥ ३ ॥

१८४९.

तुह्मीं कृपाळुजी देवा । केली सेवा आवडी ॥ १ ॥
करुनि सडासंमार्जन । पाळिलें वचन प्रमाण ॥ २ ॥
उगाळूनि गंध पुरविलें । सोहळे केले दासाचे ॥ ॥
ऐसा अपराधी पतित । एकाजनार्दनीं ह्मणत ॥ ४ ॥

तर ह्याप्रमाणें आज ३५० वर्षे जी गोष्ट हजारो लोक खरी मानीत आले आहेत, ज्या गोष्टीचें प्रत्यंतर ह्मणून 'श्रीखंड्याचा रांजण' अजून पैठणास पाहण्यास मिळतो, ज्या गोष्टीबद्दल अमृतराय, महिपति, मोरोपंतांसारखे प्रेमळ कवि साक्ष देत आहेत, जी दासोपंतमुक्तेश्वरांसारखे नाथांचे समकालीन विचक्षण संत सांगत आहेत आणि ज्याबद्दल अत्यंत महत्वाचें प्रमाण ह्मणजे हें कीं, जी गोष्ट नाथ आपल्या मुखानें स्वतः सांगत आहेत ती जे अप्रमाण मानावयास तयार असतील त्यांना नमस्कार असो! सर्वगत चिद्रूप परमेश्वर सगुणरूपाला येतो ही गोष्ट अनुभवायची आहे, शब्दांनीं सिद्ध करून दाखवायची नाहीं. तिची उपपत्ति देत बसण्याचें कारण नाहीं. तशी बळकट उपासना करावी म्हणजे उपास्य प्रत्यक्ष प्रगट होतें. संतांचा हा अनुभव आहे. आम्हां पामर जीवांना जसें हें जग प्रत्यक्ष आहे तसा भक्तांना देव प्रत्यक्ष आहे. संतांना देव नित्य सन्निध आहे. तो निर्गुण

आहे तसा सगुणही आहे. “ तुज सगुण ह्मणों कीं निर्गुण रे। सगुण निर्गुण एक गोविंदु रे ” ह्या अभंगांत ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे कीं स्थूल सूक्ष्म, दृश्यादृश्य, व्यक्ताव्यक्त एकच परमात्माच भरून राहिला आहे. प्रतीतीच्या बळानें तो ओळखायचा आहे. जो निर्गुण आहे त्याला सगुण व्हायला काय कठिण आहे? त्याला सगुण होतां येत नाहीं असें म्हणणें म्हणजे त्याच्या सर्वशक्तिमत्त्वाला बाध आणण्यासारखें आहे! आपल्या सर्वात्मकपणाला बाध न आणतां त्याला सगुण व साकार होतां येतें. जनार्दन स्वामींच्या कृपेनें जो दत्त-रूपानें देवगडावर नाथांस दिसला, जो काशीस कीर्तनप्रसंगीं प्रगट झाला, जो अनुष्ठानसमाप्तीच्या वेळीं कृष्णस्वरूपांत दृग्गोचर झाला, जो त्यांच्या घरीं बारा वर्षें श्रीखंड्यावेषानें राबला तो चराचर व्यापून राहणारा सर्वज्ञ, सर्वसाक्षी, व सर्वगत जगदात्मा त्यांच्या अपूर्व एकनिष्ठेनें त्यांना प्रत्यक्ष झाला. हरि व्यक्त आहे आणि अव्यक्तही आहे. वेदशास्त्रपुराणांनीं गाइलेला व नाथांना प्रत्यक्ष झालेला परमात्मा त्यांनीं सर्वकाळ आपल्या हृदयसंपुटीं ठेवला व सर्वभूतांच्या ठायीं त्यांनीं तोच पाहिला.



# १० काशी, पंढरी व आळंदी येथील यात्रा व नाथांचे ग्रंथ.



ग्रंथ श्रीभागवत श्रीरामायण करी सुविस्तर ते ।
जरि न रचिता दयानिधि केवळ जड जीव तरि कसे तरते ?॥
—मोरोपंत.

१ नाथांची ग्रंथसंपत्ति. २ नाथभागवत. ३ काशीचे संन्यासी. ४ नाथांचा विनय व आत्मप्रत्यय. ५ नाथभागवताचा जयजयकार. ६ नाथ व दासोपंत. ७ पंढरीची यात्रा व श्रीविठ्ठलस्तुति ८ आळंदीची यात्रा व श्रीज्ञानेश्वरसेवा. ९ ज्ञानेश्वरीचे संशोधन. १० भावार्थरामायण लिहिण्याबद्दल श्रीरामाचा बलात्कार ११ गावबा.

१ नाथांचा पहिला ग्रंथ 'चतुःश्लोकी भागवत' हा होय. हा ग्रंथ गुरुसमक्ष त्र्यंबकेश्वरास झाला असें मागें सांगितलेंच आहे. त्यानंतर त्यांचे हस्तामलक टीका, शुकाष्टक टीका, स्वात्मबोध, चिरंजीवपद, आनंदलहरी, अनुभवानंद, मुद्राविलास, लघुगीता इत्यादि ८।१० लहानलहान ग्रंथ पैठणासच झाले. हे सारे ग्रंथ अद्वैतप्रधान असून त्यांची मांडणी फार सुबोध व चित्तवेधक झाली आहे. ह्या सर्व ग्रंथांत नाथांचा स्वानुभवाचाच रंग भरलेला असल्यामुळें त्यांतील अध्यात्मविषय सुद्धा सुबोध झाला आहे. कीर्तनप्रसंगीं व ललितादि प्रसंगीं नाथांच्या मुखांतून जे सहस्रावधि अभंग बाहेर पडले व शिवाय 'जें भजनी भारुड' म्हणून निराळें निर्माण झालें त्यांचाही

उल्लेख मागें केलाच आहे. नाथांचे अत्यंत लोकप्रिय ग्रंथ म्हणजे रुक्मिणीस्वयंवर व भागवत हे होत. हे दोन्ही ग्रंथ काशीस समाप्त झाले. त्या संबंधाची मौजेची हकीकत आतां सांगावयाची आहे. नाथांचा शेवटचा ग्रंथ भावार्थरामायण हा होय. हा अपुरा राहिल्यामुळें तो त्यांच्या गावबा नामक शिष्यानें पुरा केला. नाथांची ग्रंथसंपत्ति ही एवढीच. भागवत २०००० व भावार्थरामायण ४०००० हे त्यांचे प्रचंड ग्रंथ व रुक्मिणीस्वयंवर १७००, चतुःश्लोकीभागवत १००० व बाकीचे सर्व ग्रंथ हजाराच्या पोटांत आहेत; म्हणजे नाथांचा ओवीबद्ध ग्रंथ सुमारे ६५००० असून अभंग पांच हजारांवर आहेत. सर्व कविता पाउणलाखाच्या आंत असून त्यांतील बहुतेक भाग मराठी कवितेंत पहिल्या प्रतींत गणलेला आहे. रुक्मिणी-स्वयंवर व भागवत हे ग्रंथ त्यांतल्यात्यांत अत्यंत लोकप्रिय व सन्मान्य झालेले आहेत. नाथांचे भागवत हा ग्रंथ तर सर्व जगांतल्या पहिल्या प्रतीच्या ग्रंथांत मोडलाच पाहिजे इतका तो सर्वांग सुंदर झाला आहे.

२ भागवतधर्माचे उर्फ भक्तिपंथाचे प्रधान ग्रंथ दोन. एक गीता व दुसरा भागवत. गेल्या हजार वर्षांत भरतखंडाच्या सर्व भागांत अनेक जातींत साधुसंत अवतरले व त्यांनीं ह्या दोन ग्रंथांचा मुख्य आश्रय धरून भक्तिपंथाचा प्रसार केला. महाराष्ट्रांत ह्या पंथाचे पहिले प्रवर्तक श्रीज्ञानेश्वरमहाराज हे होत. ज्ञाने-श्वर, नामदेव, एकनाथ व तुकाराम ह्या चार खांबांवर महाराष्ट्रां-

तील भक्तिग्रंथांची द्वारका उभी आहे. हे खास अभंग आहेत व त्यामुळें ह्या द्वारकेला काळही बुडवूं शकणार नाहीं. किंवा आपण अशीही कल्पना करूं कीं पंढरपूर ही भक्तांचीं म्ह० वारकऱ्यांची युनिव्हर्सिटी आहे व तिला जोडून असलेलीं आळंदी, देहु, पैठण, व त्र्यंबकेश्वर हीं कॉलेजें आहेत. श्रीकृष्ण ह्मणजे विठ्ठल हें आमचे उपास्य आहे. 'रामकृष्णहरी' हा सर्वांचा उघडा मंत्र आहे. ब्राह्मणांपासून तो अंत्यजापर्यंत सर्वांस ह्या मंत्राचा घोष करण्याचा व विठ्ठलपदप्राप्तीचा अधिकार आहे. यांत उच्चनीचभावाचा संबंधच येत नसल्यामुळें व 'रामकृष्ण हरीचा' नामघोष करण्यापलीकडे वेळ घालविणें म्हणजे आयुष्याचा नाश करणें अशी सार्वत्रिक समजूत असल्यामुळें मतभेदांना व भांडणांना यांत वावच नाहीं. आपापले व्यवसाय करून सर्व कर्म हरीला अर्पण करून आपण हरीहून वेगळे न राहणें हा वारकऱ्यांचा मुख्य धर्म आहे. अशा ह्या उदार धर्माचे महाराष्ट्रांत जे प्रमुख ग्रंथ आहेत त्यांतल्या प्रमुखांत नाथांच्या भागवताची गणना आहे. नाथांचें भागवत म्हणजे मूळ भागवताच्या ११ व्या स्कंधावरील टीका होय. ह्या अकराव्या स्कंधांत श्रीकृष्णांनीं उद्धवाला ब्रह्मोपदेश केला असल्यामुळें याला 'उद्धवगीता' असेंही म्हणतात. श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जी गीता सांगितली त्या भगवद्गीतेचें रहस्य ज्ञानेश्वर महाराजांनीं मराठींत आणलेलें असून श्रीकृष्णांनींच उद्धवाला जी गीता सांगितली तिचें रहस्य

एकनाथमहाराजांनीं मराठींत व्यक्त केलें आहे. ज्ञानेश्वरी आणि नाथभागवत ह्या दोनी ग्रंथांतील प्रतिपाद्य विषय एकच असून शब्दरचना, विषयांची मांडणी, अधिकारयुक्त ब्रह्मोपदेश, भगवत्प्रेम व स्वानुभवाचें ब्रह्मज्ञान हे दोहींत अगदी एक आहेत. ह्या संबंधानें विशेष विवेचन मी निर्णयसागरांत छापलेल्या ' एकनाथी भागवताच्या ' प्रस्तावनेंत केलेलें असल्यामुळें येथें त्याचा विस्तार करीत नाहीं.

२ नाथभागवताचे पहिले दोन अध्याय तयार झाल्यावर नाथांचा एक शिष्य त्यांची प्रत आपल्या नित्यपाठासाठीं बरोबर घेऊन काशीस गेला. तेथें एक दिवस तो माणिकर्णिकेच्या घांटावर स्नानसंध्या झाल्यावर ती वाचीत बसला असतांना तेथील एका नामांकित षड्शास्त्री संन्याशाच्या चेल्यानें तो प्रकार पाहिला व आपल्या गुरुजींस सांगितला. संन्याशी मोठे विद्वान् असून काशींत त्यांचा बोलबाला चांगला होता. भागवताचा अर्थ मराठींत करणारा हा कोण मनुष्य आहे म्हणून नाथशिष्यास विचारतांच त्यानें नाथांची संपूर्ण हकीकत आपल्या शिष्यभावास उचित अशा पूज्यभावानें सांगितली. ती ऐकून त्या प्राकृतविद्वेषी स्वामींस नाथांचा खूप राग आला व त्यानें दोन शिष्यांस पैठणास पाठवून चौकशीसाठीं एकनाथांस बोलावल्याचें पक्कड समन्स पाठविलें ! ते शिष्य पैठणास आले व नाथांस सर्व वृत्तांत निवेदन करिते झाले.

हा काशीविश्वेश्वराचा सोटा आला असें समजून नाथांनीं काशीस निघण्याचें प्रस्थान ठेवलें. रोजची विष्णुपूजा, पुराण, कीर्तन, सदावर्त हा सर्व थाट चालविण्यास उद्धवास सांगून नाथ निघाले व ते नको नको ह्मणत असतां उद्धवानें दोन शिष्य त्यांच्या शुश्रूषेसाठीं मागोमाग पाठविले. नाथांनीं भागवताची पहिली पंचाध्यायी आपल्या बरोबर काशीस नेली. नाथ घाटावर धर्मशाळेंत उतरले तेव्हां वरील स्वामींचे २०० शिष्य नाथांचा उपमर्द करून वेळेला त्यास ठोकण्यासही तयार होऊन आले होते ! पण आश्चर्याची गोष्ट ही कीं नाथांस पाहतांच हा कोणी महात्मा आहे असें त्यांस वाटून 'निंदा करावयास आलेले स्तुति करावयास लागले' असा प्रकार झाला.

४ नाथ कांहीं वेदांताचे ग्रंथ वाचून वेदांती बनलेले नव्हते. ग्रंथ तर त्यांनीं वाचलेच होते, पण सद्गुरुप्रसादानें स्वानुभवाचा रस चाखलेले ते आत्मज्ञानी महात्मे होते. त्यांच्या चेहऱ्यावर ब्रह्मज्ञानाचें तेज झळकत होतें. त्यांनीं म्हटल्याप्रमाणें "दीपु लाविजे गृहाभीतरीं। तोचि प्रकाशे गवाक्षद्वारीं। तेवीं मनीं प्रगटला श्रीहरी। तोचि इंद्रियांतरीं भजनानंदु" (भागवत अ० २-३६१). श्रीकृष्णतेज त्यांच्या सर्वांगांतून प्रगट झालें होतें. त्यांची अढळ शांति, अनुपम नम्रता, व अपूर्व समता हे गुण त्यांच्या बरोबर काशीसही गेले होते ! संन्याशाचे ते शिष्य नाथांची राहणी पाह-

तांच गार झाले व आपल्या गुरूकडे नाथांचे गुण गातच गेले! गुरु तामसवृत्तीचे असल्यामुळें शिष्यांवर उलट रागावले. नाथ गृहस्थ असून खरे संन्यासी होते व स्वामी संन्यासी असून रागी होते! मठांतमध्यें पडदा सोडून स्वामी नाथांशीं बोलत बसले! कारण काय तर म्हणे पैठणकर पाषांडी चेटक्याचें यांना तोंड पहायला नको! महाराष्ट्र भाषेंत भागवतार्थ प्रगट करणें हें स्वामींच्यामतें पाखांड! बाकी या बाबतींत स्वामींनाच नांवें ठेवायला नकोत; त्या काळच्या बहुतेक पंडितांचें असेंच मत असे. नाथांनीं प्रथमच विनयाचें भाषण करून स्वामींना अर्धे जिंकिलें. नाथ म्हणाले:—

अहो स्वामी श्रेष्ठसमर्था। सद्भावें चरणीं ठेवितों माथां।
कृपा करुनि मज अनाथा। दर्शन आतां देइजे ॥ १४२ ॥

भावहीन भक्तिहीन। ज्ञानहीन वैराग्यहीन ॥
नाहीं केलें शास्त्रपठण। वेदाध्ययन तेंही नसे ॥ १४५ ॥
तुमच्या सेवेच्या गुणें निश्चितीं। किंचित् जाहली कवित्वस्फूर्ति।
यास्तव वदला नाथ यथामति। प्रारंभ भागवतीं मांडितों ॥१४६॥
पंचाध्यायी एकादशांत। इतुकाचि सिद्ध जाहला ग्रंथ ॥
स्वामींनीं पाहूनि यथास्थित। अर्थ ध्यानासी आणिजे ॥ १४७ ॥
जितुकें जाहलें ग्रंथलेखन। यासी व्याख्यानीं लागतां दूषण ॥
तरी मणिकर्णिकेंत बुडविजे आपण। नसेचि कारण मग याचें॥१४८॥

—भक्तलिलामृत अ. २१

ह्या भाषणानें नाथांनीं श्रोत्यांनाच काय पण स्वामींनाही संतोषविलें. ह्या भाषणांत विनय तर आहेच, पण माझ्या ग्रंथाचा अर्थ नीट ध्यानीं आणा व व्याख्यानीं कोठें दूषण लागलें असलें तर तो बुडवून टाका' असें आपण होऊन सुचविण्यांत धोरणही आहे! हें मुत्सद्दीपणाचें भाषण आहे. व्याख्यानाच्या कसाला आपला ग्रंथ आयता लागणार आहे हें पाहून नाथांना आनंदच झाला. लेच्यापेच्या ग्रंथकाराला असा आत्मप्रत्यय असणें शक्य नाहीं; पण नाथ पैठणास विद्वानांच्या पुठ्यांत वाढलेले, स्वतः विद्वान् व श्रीगुरुप्रसादानें ऐश्वर्य भोगणारे असे संपन्न होते. त्यांच्या मुखांतून अयथार्थ भाषण निघायचेंच नाहीं; व याची त्यांचीत्यांना खात्रीही होती. नाथांचें भाषण ऐकून स्वामी जरा सौम्य झाले. त्यांनीं पडदा दूर सारिला व नाथांनीं त्यांस वंदन केलें पुढें सर्वमतानें असें ठरलें कीं दहा भागवती विद्वान् बसवून त्यांच्या समक्ष स्वामींच्या अध्यक्षतेखालीं नाथांच्या ग्रंथाची परीक्षा करावी. चार दिवस याप्रमाणें सभा झाल्या. स्वामीसकट सर्वांच्या मतानें अखेर ठरलें कीं, नाथांचा ग्रंथ अगदीं निर्दोष असून पूर्ण प्रासादिक आहे. मग स्वामींचें नाथांविषयीं इतकें उत्कृष्ट मत झालें कीं, त्यांनीं नाथांना तेथेंच आपल्या मठांत ठेवून घेतलें व सर्व भागवत काशींत राहूनच पूर्ण करण्याची त्यांस विनंति केली. नाथांना काशी व पैठण सारखेंच होतें. त्यांनीं भागवत ग्रंथ काशींत सहा महिन्यांत संपविला असें महि-

पति व केशव यांनीं म्हटलें आहे. नाथांनीं स्वतः ग्रंथसमाप्तीचा काळ शके १४९५ कार्तिक शुद्ध १५ सोमवार हा दिला आहे. नाथांचें रुक्मिणीस्वयंवरही काशींतच झालें. त्याच्या समाप्तीचा काळ नाथांनीं शके १४९३ रामनवमी हा दिला आहे. दोन्ही ग्रंथ ' वाराणशी मुक्तिक्षेत्रीं । मणिकर्णिका महातीरीं ।' समाप्त झाले यावरून नाथांचा काशीक्षेत्रीं २।३ वर्षें मुक्काम होता असें मानणें भाग येतें.

५ नाथांच्या भागवताचा काशीक्षेत्रीं मोठा जयजयकार झाला. वैर करायला निघालेले स्वामी तर नाथांच्या पुढें शिष्यासारखे वागूं लागले. नाथांची ब्रह्मनिष्ठा पाहून त्यांनीं नाथांच्या चरणीं लागावें व नाथांनीं त्यांच्या चतुर्थाश्रमाकडे पाहून त्यांना निवारावें. स्वामींचा मद पार जिरून जाऊन त्यांचें अगदीं रूपांतर झालें. यापुढें काशीस पैठणचाच थाट उडून राहिला. घाटावरून नाथांचीं कीर्तनें सुरू झालीं व त्या कीर्तनांला काशीकर विद्वान्‌ही भाळून गेले. भागवतसमाप्तीनंतर स्वामींनीं काशीकर पंडितांस विनंती केली कीं, ' ह्या अपूर्व ग्रंथाच्या विजयार्थ येथें मोठा उत्सव करावा. ' हें बोलणें कांहीं अभिमानी पंडितांस रुचलें नाहीं व त्यांनीं स्वामींसच दोष लाविला कीं " नीच वाणीचें श्रवण । शास्त्रविदित असे दूषण । तेंचि आदरें संस्थापन । अनर्थलक्षण हें होय ' ( केशवकृत नाथचरित्र अ० २४–२६ ). मराठी भाषा ही नीच वाणी

असून ती ऐकणें हेंच मुळीं दूषण आहे असा त्या पंडितांचा अभिप्राय पडला, तरी स्वामींनीं ग्रंथाचा उत्सव करण्याचा बेत कायम केला. यामुळें चिडून जाऊन कांहीं अविचारी पंडितांनीं सदर ग्रंथ मठांतून उचलला व गंगेंत नेऊन टाकिला, तेव्हां गंगाबाईनीं तो स्वहस्तानें वर उचलून धरिला! हा चमत्कार पाहिल्यावर मग त्या पंडितांचा अपवाद नाहींसा झाला. स्वामींनीं नाथांची हत्तीवरून मिरवणूक काढण्याचें ठरविलें, पण नाथांनीं "मी ब्राह्मणांचा दासानुदास। निजकृपेची धरूनि आस। सद्भावें पूजावें या ग्रंथास। तेणें संतोष आह्मांसी" (भ० ली० २१--१३) असें विनयाचें उत्तर दिलें. संन्याशानें 'अंबारींत बसा ग्रंथासहित' म्हणून विनविलें तथापि या महात्म्यानें 'हेंही अनुचित मी करींना' म्हणून स्पष्ट जबाब दिला!! मग ग्रंथ अंबारींत मांडला व त्याची सर्वोपचारें पूजा करून मिरवणूक काढली. समुदाय प्रचंड जमला होता. चार दिवस कीर्तनाचा महोत्सव होऊन गोपाळकाला झाला. ब्राह्मणभोजन व दानधर्म बहुत झाला. काशीक्षेत्रीं आपल्या ग्रंथाचा ह्याप्रमाणें जाणत्यानेणत्या सर्वांकडून जयजयकार करवून आपल्या सदाचारानें सर्वांस चटका लावून नाथ स्वदेशी परत आले.

६ नाथांच्या भागवताच्या कित्येक प्रती काशीस भाविक लोकांनीं करून घेतल्यावर ग्रंथविजयोत्सवाची समाप्ति करून नाथ

पठणास जाण्यास परतले तों वाटेंत जोगाईचे आंबे येथें दासोपं-
तांची व त्यांची गांठ पडली. दासोपंतही मोठे दत्तभक्त असून
त्यांस श्रीदत्ताचा साक्षात्कार असे. दासोपंत हे बेदरच्या पात-
शाहींत नारायण पेठ येथें गाल्वगोत्री दिगंबरपंत देशपांडे ह्मणून
गृहस्थ असत त्यांचे पुत्र होत. त्याचा जन्म शके १४७३ भाद्रपद
वद्य ८ स झाला असून हे आपल्या वयाच्या ६४ व्या वर्षी शके
१५३७ माघ वद्य ६ रोजीं समाधिस्थ झाले. दासोपंतांनीं बाळ-
पणींच तीव्र अनुष्ठान केलें होतें. ' गळित पत्रें नित्य भाक्षित ।
देहाची आस्था नसे किंचित । खडकावरी शयन करीत । शीतोष्ण
साहत निजांगें ' ( भ० ली० २२-५१ ) असें बारा वर्षे अनुष्ठान
केल्यावर दासोपंतांस साक्षात् दत्तदर्शन झालें व तेव्हांपासून
दासोपंतांचे दत्तराज खेळगडी झाले ! असो. दासोपंतांचें साग्र
चरित्र देण्यास येथें स्थळावकाश नाहीं. त्यांनीं गीतेवर सव्वा लाख
ओव्या लिहिल्या असून इतर लहान मोठे चाळीस ग्रंथ लिहिले
आहेत ! या शिवाय त्यांचीं ५।७ हजार पदें आहेत दासोपंतांच्या
इतकी ग्रंथसंपत्ति मराठी कवींत तरी दुसऱ्या कोणाचीही नाहीं !
असें सांगतात कीं नाथांच्या यशाचा हे थोडासा हेवा करीत
ह्मणून दत्तानीं यांस शाप दिला व ह्मणून यांचे ग्रंथ मागें पडले.
निळोबारायांचा नाथांवरील अभंग शेवटीं दिला आहे त्यांतही
' दासोपंतांचा अभिमान ' नाथांच्या दारीं चोपदाराच्या वेषांत

श्रीदत्त उभे राहिलेले त्यांनीं पाहिले ह्मणून गेला असें म्हटलें आहे त्यावरूनही वरील आख्यायिकेंत कांहीं तथ्य असेल असें वाटतें. कसेंही असलें तरी दासोपंतांचें मन नाथांविषयीं पुढें तरी निर्मळ झालें असें त्यांनीं नाथस्तवनपर केलेल्या उत्कृष्ट पदावरून दिसतें. तें पद शेवटीं दिलें आहे. त्या पदांतही वरील गोष्टीचा ध्वनि असावा असें " दत्तात्रेय धरुनि दार रक्षि होउनि चोपदार। चमत्कार हाचि फार दासोपंत चोजविलारे " ह्या चरणावरून दिसतें. दासोपंतास श्रीदत्तसाक्षात्काराचा जो अभिमान वाटत होता तो श्रीदत्तात्रेयांनीं नाथांच्या दारीं षष्ठीच्या उत्सवांत चोपदार ह्मणून उभे राहून घालविला एवढें खरें. ह्या दत्तभक्ताच्या ठिकाणचा हा अभिमानही कांहीं काळानंतर नाहींसा झाला व ते आणि नाथ समानपदारूढ झाले. नाथांची त्यांची पहिली भेट झाली तेव्हां ते वयानें लहान होते. त्यावेळीं व नंतर हे उभय दत्तोपासक संतकवि पुष्कळ वेळ एकांतांत स्वानंदसुखाच्या गोष्टी करीत असत.

७ वरील गोष्टीस कांहीं वर्षें गेल्यावर नाथांच्या मनांत पंढरीस जाण्याचें आलें. नाथांनीं लावलेल्या रीतीप्रमाणें वागण्याचें उद्धवानें कबूल केलें व नाथ मोठ्या थाटानें पंढरीच्या यात्रेस निघाले. त्यांच्या बरोबर आसपासचे शेंकडो वारकरी निघाले, नाथांचें संगतिसुखहि मिळेल व पांडुरंगाचें दर्शनही होईल ह्मणून वाटेंतही आणखी पुष्कळ लोक त्यांस येऊन मिळाले. असें करितां करितां नाथ

पंढरपुराजवळ आले तेव्हां त्यांच्यामागें मनुष्यसमुदाय समुद्रासारखा जमला होता! वाटभर विठ्ठलाचें भजन चाललें होतें. दिंड्या-पताकांचे जिकडे तिकडे संभार दिसत होतें. पंढरपुराजवळ जातांच गांवांतील हजारो लोक नाथांस सामोरे आले व मोठ्या थाटानें वाजतगाजत त्यांनीं नाथांस गांवांत नेले. चंद्रभागेचें स्नान, पुंडलीकाचें दर्शन, गांवप्रदक्षिणा हे नाथांनीं सर्व यथासांग केलें. श्रीविठ्ठलाचें सांवळें सगुणरूप नाथांच्या हृदयांत नेहमीं खेळत होतेंच, पण आंत तेंच बाहेर पाहतांच त्यांच्या प्रेमसाग-रास भरती आली. गरुडपारापुढें त्यांचीं चार कीर्तनें झालीं. एक दिवस बडव्यांच्या विनंतीवरून नाथांनीं भानुदासांचें चरित्र कीर्तनास लावलें. तेव्हां सर्वत्र आनंदीआनंद भरून गेला होता. नाथांच्या सत्कीर्तीचा गजर नुस्ता ऐकून जे होते त्यांना त्यांचें दर्शन होऊन त्यांच्या जिवंतवाणींतून प्रगट झालेलें अलौकिक वक्तृत्व ऐकावयास सांपडल्यामुळें आपल्या कानानेत्रांचें साफल्य झालें असें वाटलें. भानुदासांचें प्रेमळ चरित्र त्यांच्या पणताच्या तोंडून ऐकतांच श्रोत्यांची वृत्ति तल्लीन झाली. पंढरीच्या कीर्तनप्रसंगीं नाथांच्या मुखांतून सहजगत्या जे शेंकडो प्रासादिक अभंग निघाले त्यांपैकीं ४।५ ह्या ठिकाणीं देतों:—

### अभंग.

उदंड क्षेत्रांची पाहिली रचना । पंढरी ते जाणा भूवैकुंठ ॥१

तीर्थ आणि देव संतसमागम । ऐसें सर्वोत्तम कोठें नाहीं ॥२॥
पंढरीसारिखें तीर्थ महीवरी । न देखों चराचरीं त्रैलोक्यांत ॥३॥
एकाजनार्दनीं सुखाची विश्रांती । पाहतां विठ्ठलमूर्ति लाभ बहु

२

आशा धरूनियां आलों येथवरी । पाहतां पंढरी पावन झालों ॥१॥
आलिया जन्माचें सुफळ झालें काज । दृष्टी गरुडध्वज पाहतांची २
एकाजनार्दनी पावलों विश्रांती । पाहतां विठ्ठलमूर्ति भीमातटीं ३

३

अनंताचे गुण अनंत अपार । न कळेचिपार श्रुतिशास्त्रां ॥ १ ॥
तो हा महाराज विटेवरी उभा । लावण्याचा गाभा शोभतसे ॥ २ ॥
कटावरी कर ठेवी जगजेठी । पाहे कृपादृष्टी भक्ताकडे ॥ ३ ॥
पुंडलिकाचे तपें जोडलासे ठेवा । एकाजनार्दनीं सेवा देई देवा

४

उघडा हा मंत्र विठ्ठल वदा वाचे । अनंत जन्माचे दोष जाती ॥ १ ॥
न करी आळस आलियां संसारीं । वदा निरंतरीं विठ्ठलनाम ॥ २ ॥
साधेल साधन तुटती बंधनें । विठ्ठलनाम जाण जप करी ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं आसनीं शयनीं । विठ्ठल निशिदिनीं जप करी ॥ ४ ॥

५

आवडीनें भावें हरिनाम गावें । सप्रेम नाचावें कीर्तनरंगीं ॥ १ ॥
तरती तरती तरती संसार । आणिक विचार दुजा नाहीं ॥ २ ॥
एकाजनार्दनीं भावाचें माहेर । तरिजे संसार क्षणमात्रें ॥ ३ ॥

८ शके १५०५ मध्यें नाथांना आळंदीस जाण्याचा योग आला. एके दिवशीं नाथांचा घसा सुजून दुखूं लागला, त्यावर बरेच औषधोपचार झाले पण सूज उतरेना. तिसऱ्या दिवशीं स्वप्नांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं दृष्टांत देऊन त्यांस सांगितलें कीं 'माझ्या मानेस अजानवृक्षाच्या मुळीचा गळफांस बसला आहे तो तूं स्वतः येथें येऊन काढ ह्मणजे तुझा घसा बरा होईल!' यानंतर समुदाय बरोबर घेऊन कीर्तन करीत नाथमहाराजांची स्वारी आळंदीस आली. या संबंधानें नाथांचा अभंगः—

श्रीज्ञानदेवें येऊनी स्वप्नांत। सांगितली मात मजलागीं॥ १॥
दिव्यतेजःपुंज मदनाचा पुतळा। परब्रह्म केवळ बोलतसे॥ २॥
अजानवृक्षाची मुळी कंठास लागली। येऊनी आळंदीं काढ वेगीं॥३॥
ऐसें स्वप्न होतां आलों अलंकापुरी। तंव नदीमाझारी देखिलें द्वार॥४॥
**एकाजनार्दनीं** पूर्वपुण्य फळलें। श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर॥ ५॥

नाथ आळंदीस आले तेव्हां तेथें वस्ती नव्हती. सभोंवार गर्द झाडी असून आंत जाण्यासही लोक भीत. आळंदीस श्रीसिद्धेश्वराचें स्थान अत्यंत प्राचीन असून तें एक दिव्य तपोवन होतें. बरोबरच्या मंडळीस बाहेर बसवून नाथ एकटे समाधिस्थानाच्या शोधार्थ आंत शिरले. समाधीजवळ अजानवृक्ष होता तो दुरूनच त्यांनीं पाहिला तेव्हां त्यांस फार आनंद झाला. समाधीचें द्वार उघडून ते आंत शिरले, " तों वज्रासन घालोनि सहज। तेथेंचि बैसले

ज्ञानराज । दिव्यस्वरूप दिसे तेजःपुंज । उपमा न साजे तयासी ॥ ( भक्तिविजय अ० ४६–१६७ ). श्रीज्ञानेश्वरांचें दर्शन होतांच नाथांनीं त्यांचे पायीं लोटांगण घातलें. ज्ञानेश्वरांचा एकांत तीन अहोरात्र झाला असें केशवानें नाथचरित्रांत लिहिलें आहे. ह्या एकांतांत काय ब्रह्मानंद लोटला असेल याची कल्पना विषयपंकीचे दर्दुर जे आह्मीं पामर त्यांना कशी करितां यावी ? नाथ अगोदरच पूर्ण-पुरुष होते. त्यांत अजानवृक्षाची मुळीं मस्तकाला लागल्याचें मिष करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं नाथांस साक्षाद्दर्शन दिलें व ज्ञानेश्वरीचा लोकांत प्रसार करण्याची आज्ञा केली. नाथ समाधीच्या बाहेर आल्यावर लोकांनीं चुनेगच्चीनें बुजवून पूर्ववत दगड रचून टाकले. ही गोष्ट शके १५०५ च्या जेष्ठांत झाली. नाथांचा मुक्काम आळं-दीस एकादशीपर्यंत होता. एकादशीस नाथांनीं बाहेर कीर्तन केलें. नाथांच्या बरोबर यात्रा फार होती, तितक्यांस शिधासा-मोग्रीची मोठी अडचण पडूं लागली तेव्हां देवानें कानडा लिंगाय-ताचें रूप घेऊन पालें ठोकून दुकान मांडलें. सर्व लोकांस त्यानें द्वादशीचा शिधा पुरविला. पैसे कोणापाशीं मागितले नाहींत. ‘ नाथ बहुत समर्थ आहेत, पैशाचा हिशोब ते आणि आम्हीं पाहून घेऊं ’ असें त्यानें सांगितलें. नाथांचा मुक्काम हालायची वेळ आली तेव्हां तो लिंगाईत एकाएकीं गुप्त झाला ! ही गोष्ट नाथांनीं दोन अभंगांत सांगितली आहे. आळंदीसच नाथांनीं चारी भाव-

डांवर अनेक प्रेमळ अभंग केले. ‘ येथीचे वृक्ष पाषाण । ते अवघे देव जाण । ह्मणे एकाजनार्दन । येथें संशय नाहीं.’ अजानवृक्षाचीं पानें भक्षून जो आळंदीस अनुष्ठान करील किंवा ज्ञानेश्वरीची तीन सप्तकें ह्मणजे २१ पारायणें करील त्यास सद्यः ज्ञानप्राप्ति होईल असें नाथांनीं स्पष्ट म्हटलें आहे.

१

ॐ नमो ज्ञानेश्वरा । करुणाकरा दयाळा ॥ १ ॥
तुमचा अनुग्रह लाधलों । पावन जालों चराचरीं ॥ २ ॥
मी कळाकुसरी कांहींच नेणे । बोलतों वचनें भाविका ॥३॥
एकाजनार्दनी तुमचा दास । त्याची आस पुरवावी ॥४॥

२

धन्य जाहलों आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥
आजी देखिलीं पाउलें । सुख जालें समाधान ॥ २ ॥
निवारला भागशीण । पाहतां चरण गोमटें ॥ ३ ॥
भय निवारली खंती । दृष्टी मूर्ती पाहतां ॥ ४ ॥
समाधिसोहळा देखिला । एकाजनार्दन सुखावला ॥ ५ ॥

९ नाथांनीं पैठणास आल्याबरोबर ज्ञानेश्वरीच्या संशोधनाचें काम जारीनें हातीं घेतलें, कांहीं अशुद्ध व अबद्ध पाठ लेखक—पाठकांच्या चुकीमुळें तींत घुसडलें गेलें होते ते त्यांनीं काढून टाकून शुद्ध प्रत मराठी वाचकांच्या हातीं दिली. नाथांचें संशोधन शके

१५०६ तारणनाम संवत्सरीं संपलें. नाथांच्या वेळीं पैठणांत मौलानारून नामक एक मुसलमानी अवलिया होता. तो मोठा विरक्त, ज्ञानी व स्वानुभवसंपन्न महात्मा होता. एक दिवस नाथमहाराज सायंकाळीं त्याच्या मशीदीवरून जात असतांना तो शालजोडीला ठिगळे लावीत असलेला त्यांस आढळला. नाथांनीं त्यांस हें काय करितां म्हणून विचारिलें तेव्हां त्या निस्पृह महात्म्यानें नाथांस सांगितलें कीं "ज्ञानेश्वरींत फेरफार करून पदरच्या ओव्या त्यांत एकनाथ घालणार आहे म्हणून ऐकतों तर त्याची ज्ञानेश्वरी कशी दिसेल तें पाहण्यासाठीं मी हा उद्योग आरंभिला आहे!" हें ऐकतांच एकनाथांनीं आपला पहिला बेत सोडून दिला व ज्ञानेश्वरीरूप अमृताच्या ताटांत कोणीही पदरची नरोटी ठेवूं नये असा सर्वांस निर्बंध घालून दिला असें म्हणतात. ही गोष्ट भक्तकथामृतसारांत दिली आहे व 'मौलानारून साहेबकी मसनवी' नामक ग्रंथ उर्दू भाषा शिकणाऱ्या विद्यार्थ्यांस अभ्यासावा लागतो त्यांतही दिलेली आहे असें भिंगारकरबोवांनीं लिहिलें आहे. सदर ग्रंथ म्हणजे वरील अवलियानेंच लिहिलेला ग्रंथ होय. ह्या संबंधानें ज्यास्त विवेचन अवश्य तर मी श्रीज्ञानेश्वरचरित्रांत करीन.

१० भावार्थरामायण हा नाथांचा अखेरचा ग्रंथ होय. हा ग्रंथ फार मोठा असून ह्या ग्रंथाच्या इतिहासाबरोबर नाथांचा वेडसरशिष्य गावबा याचाही इतिहास सांगितला पाहिजे! हें रामायण इतर रामायणा-

प्रमाणें अर्थातच सप्तकांडात्मक आहे. याचीं पहिलीं पांच कांडें व युद्धकांडांचे ४४ अध्याय नाथांनीं रचलेले असून युद्धकांडाचे पुढील अध्याय व उत्तरकांड गावबानें रचलेले आहेत. हाही ग्रंथ मुख्यतः अध्यात्मपर आहे. 'अध्यात्मरामायणांत' इतिहासाचा भाग कमी आहे, पण यांत नाथांनीं अनेक रामपर ग्रंथांच्या आधारानें इतिहासाचा भाग भरपूर वर्णिला असून सर्व रामायण अध्यात्मतंतूंनीं विणलेलें आहे. रामकथा व ब्रह्मकथा किंवा इतिहास व अध्यात्म ह्या दोहोंचाही लाभ प्रस्तुत ग्रंथ वाचल्यापासून होणार आहे. वाल्मीकिरामायण, आनंदरामायण, योगवासिष्ठ इत्यादि संस्कृत ग्रंथांचे आधार नाथांनीं यांत घेतलेले असून ग्रंथरचनेचा एकंदर थाट बराच स्वतंत्र आहे. ह्या रामायणांत पदोपदीं अध्यात्मविचारांचीं व नाथांच्या ग्रंथांत विशेषत्वानें आढळणाऱ्या रूपकांची गर्दी उसळून गेल्यामुळें रामचरित्र व ब्रह्मज्ञान यांची काव्याच्या मनोहर उद्यानांत भेट झाली आहे! प्रत्येक कथेंत अध्यात्म पाहण्याची नाथांची दृष्टि त्यांच्या ब्रह्मस्थितीची निदर्शक आहे. परोपकारांत व जगदुद्धारकर्मांत गढलेला ब्रह्मनिष्ठ पुरुष जसें रामायण वर्णील तसेंच हें रामायण झालें आहे! वर्णनें अत्यंत सरस व हृदयंगम असून ग्रंथ पूर्ण प्रासादिक आहे. रामकथा व परमार्थ दोन्ही एकमुखानें एकदम भेटावेत अशी ज्याला इच्छा असेल त्याला नाथांच्या भावार्थरामायणासारखा दुसरा ग्रंथ आढळणार नाहीं.

असा हा अत्युत्कृष्ट ग्रंथ नाथांच्या हातून पूर्ण तडीस गेला नाहीं, तरी गावबानें लोकांच्या आग्रहास्तव तो नाथाज्ञेनें पूर्ण केला. या ग्रंथाच्या स्फूर्तीबद्दल नाथ लिहितातः–(अ. ४)

तूं कैसा झालासि वक्ता। पुसाल माझी योग्यता ॥
तेंही मी सांगेन तत्वता। सावध श्रोता परिसावी ॥ ८ ॥
मी नेणे मुळींच्या संस्कृताशी। मूर्खपण माझी मिराशी ॥
त्या मूर्खाच्या मुखाशी। श्रीराम ऐसी कथा वदवी ॥ ९ ॥
प्रेरितांही न करी जाण। तंव स्वप्नामाजी रामायण ॥
श्रीराम विस्तारी संपूर्ण। पूर्ण खूण ग्रंथाची ॥१०॥
जागृतीमाजी वर्तता। पुढें प्रकाशें रामकथा ॥
दुश्चितपणें ठेवों जातां। राम तत्वता रामायण दावी १२
करूं जातां फुकट गोठी। त्यामाजी रामकथा उठी ॥
रामें पुरविली पाठी। खिळिली दृष्टी रामायणीं ॥१३॥
ऐसियांत न करी म्हणतां। राम चढे मीपणाचे माथां ॥
मग तो आपुलिया निजसत्ता। वदवी कथा बळात्कारें ॥१४॥

रामानें असा बलात्कार करून ग्रंथ लिहावयास लावल्याचा प्रसंग फारच थोड्या ग्रंथकारांवर येत असेल!! जागृतींत रामकथाच पुढें दिसावी, स्वप्नांत रामचरित्रच पुढें उभें असावें, फुकट गोष्टी करूं जातांही त्यांत रामकथा प्रगट व्हावी, ह्याप्रमाणें रामानें नाथांची अगदीं पाठ पुरवून टाकली व दृष्टीच रामायणावर खिळून टाकली!

असा प्रकार झाला तरी मी रामचरित्र लिहिणार नाहीं असा (नाथ म्हणतात) मी हेका धरिला तेव्हां—काय चमत्कार सांगावा? राम चढे मीपणाचे माथां (रामच माझा मीपणा होऊन बसला) आणि मग? मग काय? 'मग तो आपुलिया सत्ता। वदवी कथा बलात्कारें!' असा रामाचा जुलूम नाथासारख्या ग्रंथकाराशिवाय दुसऱ्या कोणाच्या वांटयाला येणार आहे? नाथांच्या मानगुटी-वर बसून जबरदस्तीनें रामानें हें रामायण नाथांकडून लिहविलें आहे! ह्या जबरदस्तीची फिर्याद तरी नाथांनीं कुणाकडे न्यावी? फिर्याद नेण्याला रामाहून वरिष्ठ कोर्ट त्रैलोक्यांत दुसरें नसल्या-मुळें नाथ मुकाटयानें कबूल झालें. पण ते तरी प्रज्ञावंतच पडले! रामाची त्यांस नित्य संगत असल्यामुळें बरोबरीचें नातें जडलेलें. त्यांनीं एक अशी चातुर्याची पकड घेतली कीं कांहीं पुसायची सोय नाहीं! ते म्हणाले 'तुझा बलात्कार जर मजवर होणार असेल तर नफ्यातोटयाचा मालकही तूं! मजकडे मग कांहींच लिगाड राहिलें नाहीं.' हा भाव मनांत आणून ते म्हणतातः—

> यालागीं कथादूषणभूषण। माझे अंगीं न लगे जाण॥
> कर्ता श्रीराम आपण। माझें मीपण तो जाला!॥ १६॥
> ग्रंथ निंदिती अथवा वंदिती। ते दोघे आम्हां ब्रह्ममूर्ती।
> हे श्रीजनार्दनाची युक्ति। उपदेश एकांतीं निजगुह्यार्थ॥ १७॥

या प्रकारानें मी कच्चया गुरूचा चेला नाहीं असें नाथांनीं व्यक्त केलें.

११ नाथांचें भावार्थरामायण युद्धकांडाच्या ४४ अध्यायांपर्यंत आलें तों त्यांचा निर्याणसमय ओढवला. ग्रंथ अपुरा राहणार ह्मणून श्रोत्यांस फार वाईट वाटलें. कृष्णदास लोळे रामायणकर्ता नाथांकडे पूर्वीं एकदां आला होता. त्याचें युद्धकांड संपण्यास ११ दिवसांची मुदत पाहिजे होती, तेव्हां नाथांनीं त्याचें मरण ११ दिवस लांबवून त्याच्या हातून ग्रंथ पूर्ण करविला होता! ह्या गोष्टीची नाथांस श्रोत्यांनीं आठवण दिली व भावार्थरामायणाच्या समाप्तीपर्यंत तरी मृत्युकाळ लांबवण्यास सांगितलें, पण नाथांनीं काळवंचना करण्याचें नाकारलें. रामायणास प्रारंभ करितांना ज्यांनीं मीपणा अंगावर घेतला नाहीं तें ग्रंथसिद्धीची वाट थोडीच पाहणार!

देहीं असावी देहबुद्धी। तैं जाल्या कवितेची हर्षसिद्धी॥
श्रीनाथ नैराश्य आधी। लौकिकविधी, नावडे पै॥ ११०॥
केशवकृत नाथच० (अ० १९)

काळाला शिक्षा करून ग्रंथ समाप्तीस नेण्याचें कारण नाहीं असें नाथांनीं सांगितलें; तरी कित्येकांनीं आग्रह केला तेव्हां नाथांच्या घरीं गावबा ह्मणून एक वेडसर शिष्य होता, त्यास नाथांनीं पुढें बोलावलें व ग्रंथ समाप्त करण्याची आज्ञा केली! गावबा सर्वांच्या परिचयांतला व त्याची विद्वता केवढी आहे याची सर्वांस ओळख होती त्यामुळें नाथांनीं गावबाचें नांव घेतलें तेव्हां हा

विनोद असेल असें वाटून सर्वांस हसूं आलें! पण नाथांसारखे पुरुष जे विनोदानें बोलतील तें सुद्धां खरें करणें हरीला भाग आहे. गावबा गंगातीरच्या एका कुळकर्ण्याचा मुलगा असून त्याला बाळ-पणापासून पुरणपोळी खाण्याची फार आवड होती. त्याला गायत्री-मंत्र सुद्धां धड उच्चारतां येत नव्हता. असा हा स्थूलबुद्धि मुलगा पुरणपोळीसाठीं एक दिवस हट्ट धरून बसला असतांना त्याचें आईनें त्यास सांगितलें कीं 'पैठणांस एकनाथ ह्मणून साधु आहेत त्यांच्या घरीं जा, ह्मणजे तुला रोज पुरणपोळी खायला मिळेल!' मुलगा उठला तो चालूं लागला. पैठणास हा नाथांकडे आला तेव्हां नाथांनीं हरिपंडितासारखे याला ममतेनें वागवीत जा ह्मणून गिरि-जाबाईस सांगितलें. तेव्हांपासून हा १५ वर्षें नाथांच्या घरींच होता. याला नाथ मंत्रोपदेश देऊं लागले तेव्हां 'एकनाथ' ह्या शब्दाशिवाय मी दुसरा मंत्र जपणार नाहीं असें यानें सांगितलें. नाथांच्या घरीं कथापुराणें एकण्यांत व नाथांच्या सर्वकाळ सन्निध राहून पडेल तें काम आवडीनें करण्यांत हा सदा दक्ष असे. असा वेडसर मनुष्य सत्संगतीनें इतका तयार झाला कीं नाथाज्ञेनें त्यांनीं वरील प्रसंगीं ४५ वा अध्याय करून दाखविला व नाथांच्या पश्चात् सर्व भावार्थरामायण तडीस नेलें!!



# ११ अखेर.



गेले बहुत वैभवाचे । गेले बहुत आयुष्याचे ।
गेले अगाध महिमेचे । मृत्युपंथें ॥ ४६ ॥
असो ऐसे सकळही गेले । परंतु एकचि राहिले ।
जे स्वरूपाकार झाले । आत्मज्ञानी ॥ ५९ ॥

—दासबोध द० ३ स० ९

१ नाथांची अपत्यें. नाथांचा नातु लीलाविश्वंभरसुत मुक्तेश्वर. २ नाथ व हरिपंडित अथवा भक्ति व पांडित्य. ३ पत्रावळीची गोष्ट. ४ नाथांचें देहावसान.

१ नाथांस गिरिजाबाईपासून तीन अपत्यें झालीं. प्रथम गोदावरी नांवाची कन्या झाली, तिच्या पाठीमागून हरि नामक पुत्र झाला व शेवटीं गंगानामक कन्या झाली. नाथांची पहिली कन्या गोदा पैठणासच राहणाऱ्या चिंतोपंत नामक विद्वान् व सुशील गृहस्थास दिली होती. हे प्रथम थोडे विषयी होते, पण नाथसंगतीनें सुधारले व नाथांनीं यांस दत्तभक्तीस लावलें. गोदेचे सासरचें नांव गंगाबाई असून नाथ तिला बाळपणापासून लीलेनें 'लीला' म्हणत. चिंतोपंतांचें दुसरें नांव 'विश्वंभर' असें होतें. गोदा, लीला उर्फ गंगाबाई आणि चिंतोपंत उर्फ विश्वंभरबोवा यांजपासून सुप्रसिद्ध कवि मुक्तेश्वर हा जन्मला. मुक्तेश्वर हा अर्थात् नाथांचा नातु. यानें आपल्या भारतांत 'मातृजनक जनार्दनी एकनाथ नमियेला' असें

म्हटलें आहे. याचें आडनांव मुद्गल, गोत्र अत्रि, व हा अर्थातच आश्वलायनशाखी ऋग्वेदी ब्राह्मण. मुक्तेश्वर हा पुढें जगविख्यात कवि झाला व त्यानें रामायण, भारत व भागवत यांवर उत्कृष्ट ग्रंथरचना[1] केली. मुक्तेश्वरानें 'लीलाविश्वंभर' ह्या पदानें आईबापांस वारंवार नमन केलें आहे. 'लीलाविश्वंभरगुरुचरणीं। पुष्पांजली वचन सुमनीं। मुक्तेश्वरें अर्पूनि मनीं। कृतकृत्यता मानिली' (मुक्तेश्वरी भारत, वनपर्व). ह्याशिवाय स्वतःबद्दल सभापर्वांत एके ठिकाणीं 'तो मुद्गलचिंतामणिसुत। लीलाविश्वंभर जगविख्यात' असें त्यानें म्हटलें आहे. ह्या मुद्गलांचे कुळदैवत कोल्हापूरची जगदंबा व तसाच बार्शीजवळचा सोनारी येथील भैरवनाथ हे होत. मुक्तेश्वरास बापापासूनच 'दत्तोपासनेची' दीक्षा मिळाली होती. मुक्तेश्वरानें आदिपर्वाच्या उपसंहारांत म्हटलें आहे:—

प्रसिद्ध महाराष्ट्रदेशीं। गोदावरीतटनिवासी ॥
अत्रिगोत्र पवित्रवंशीं। जन्म जाहला जयातें ॥ ६ ॥
तो चिंतामणिभूदेवकुमर। श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर ॥
श्रोतया विनवी मुक्तेश्वर। क्षमा कीजे समस्तीं ॥ ७ ॥

---

१ मुक्तेश्वराचें श्लोकबद्धरामायण प्रसिद्ध आहे. त्याचें भागवत उपलब्ध नाहीं. भारताचीं पहिलीं चार व पुढील एक सौप्तिक पर्व अशीं पांचच पर्वें छापलीं आहेत, पण त्यावरून तो कवि लोकनायक ह्या पदवीस सर्वथा पात्र कसा आहे हें दिसतें. ह्याचीं कांहीं स्फुट प्रकरणेंही छापलेलीं आहेत.

करवीर लक्ष्मी विष्णुभाजा । भैरव सुवर्णपुरीचा राजा ॥
उभय कुळदैवतीं माझा । मस्तक पायीं स्पर्शिला ॥ ८ ॥

मुक्तेश्वर हा जन्मतः मुका होता, व त्याकडे पाहून लीलावती दुःखानें रडे. ती एकदा बापापाशीं हट्ट धरून बसली, तेव्हां नाथांनीं त्याच्या मस्तकावर हात ठेवून त्याला बोलका केला व 'हा पुढें मोठा कवि होईल' असा त्यांस आशीर्वाद दिला ! 'मूकं करोति वाचालं' हें सहजसामर्थ्य ज्या महात्म्याच्या ठिकाणीं होतें अशा त्रिभुवन-विजयी बापानें आपला हट्ट अशा प्रकारें पुरविला हें पाहून लीलेला किती आनंद झाला असेल ! मुक्तेश्वराला नाथांचा सहवास बाल-पणीं बराच झाला. मुक्तेश्वर पुढें मोठा प्रासादिक कवि व दत्तो-पासक झाला. त्याची नाथांविषयींची पूज्यबुद्धि त्याच्या आरत्यांत व पदांत व्यक्त झाली आहे. चिंतामणिमुद्गलाची समाध पैठणास नाथांच्या वाड्याशेजारी आहे व ती 'नाथांच्या जावयाची समाध' ह्मणून पैठणास लोक दाखवितात. मुक्तेश्वर पुढें कुरुंदवाडाजवळ पंचगंगेच्या तीरीं तेरवाडगांवीं समाधिस्थ झाले. त्यांचा पणतु मुक्तेश्वरबावा यांस कोल्हापुरच्या शंभुछत्रपतींनें शके १६४९ मध्यें एक व शके १६८० मध्यें एक अशा दोन सनदा तेरवाडगांव इनाम दिल्याबद्दल दिल्या आहेत त्यांत "थोरले मुक्तेश्वर गोसावी, हे श्री एकनाथस्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र यांचें वृंदावन मौजे तेरवाड प्रांत रायबाग येथें आहे" असे शब्द आहेत. तेरवा-

डचे इनामदार हे लीलाविश्वंभरसुत जो मुक्तेश्वर त्याचे वंशज आहेत. नाथांच्या पाहिल्या मुलीसंबंधानें अतिसंक्षेपानें हें वृत्त दिलें आहे. दुसरी मुलगी गंगा ही कर्नाटकांत नाथांचा एक जुना सोयरा होता त्याच्या मुलास दिली असून तिला ' पुंडाजी ' नांवाचा एक मुलगा झाला होता. ह्या पलीकडे तिची माहिती मिळत नाहीं. असो. नाथांच्या दोन्ही मुलींबद्दल थोडक्यांत माहिती दिली आहे, आतां नाथांचे पुत्र हरिपंडित यांजकडे वळूं.

२. नाथांचा पुत्र हरिपंडित हा मोठा बुद्धिवान् व विद्वान् होता. षट्शास्त्राध्ययन अल्पवयांतच होऊन तो विद्धन्मान्य झाला. त्यास नाथांचें वर्तन पसंत नव्हतें. तो संस्कृत भाषेचा अत्यंत अभिमानी असून आपले वडील प्राकृत भाषेंत ग्रंथ करितात, प्राकृतांत पुराणें सांगतात व प्राकृत लोकांतच वागतात हें त्यास अगदीं आवडत नसे ! नाथांनीं त्यास ' संस्कृतवाणी देवें केली ! प्राकृत काय चोरापासून झाली ? ' असें विचारून प्रतिपादन करावें कीं, " देवासी नाहीं वाचाभिमान । संस्कृत प्राकृत त्या समान । ज्या वाणीं जालें ब्रह्मकथन । त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे ! " ( भागवत २९ ) देवाला भाषेचा अभिमान नाहीं, त्याला सर्वभाषा सारख्याच आहेत, देव शब्दांकडे पाहत नसून तो भावार्थाचा भोक्ता आहे, प्राकृत लोकांच्या उद्धारार्थ प्राकृत भाषेंतच ग्रंथ करून प्राकृत भाषेंतच निरूपणव्याख्यानादि केलें पाहिजे असें नाथांचें मत असे

व तें त्यांनीं आपल्या भागवतांत जागोजाग स्पष्ट केलें आहे. हरिपंडितांनीं संस्कृत भाषेचा अभिमान घेऊन प्राकृतभाषेस तुच्छ करावें व नाथांनीं ज्ञानेश्वरीअमृतानुभवासारखे ग्रंथ पुढें करून ते संस्कृतापेक्षां कोणत्या बाजूनें न्यून आहेत तें सांग ह्मणून विचारावें ! नाथ संस्कृतवाणीचा कधीं अनादर करीत नसत, पण मराठी भाषे-विषयीं त्यांना मोठें प्रेम असे. 'माझी मराठी भाषा चोखडी । परब्रह्में फळली गाढी' असें त्यांनीं ह्मणावें. ज्या वाणींत हरि-कथाप्रेम आहे तीच वाणी सरस असें त्यांचें सांगणें होतें. ते खरे खरे भागवत म्हणजे पूर्णानुभवी असून हरिप्रेमानंद अखंड भोगणारे भक्त होते. "प्रेमेंवीण श्रुतिस्मृतिज्ञान । प्रेमेंवीण ध्यान-पूजन । प्रेमेंवीण श्रवणकीर्तन । वृथा जाण नृपनाथा" (नाथभागवत अ २-३२३). आत्मज्ञानाच्या अंगानें ते परिपूर्ण होते, अखंड ब्रह्मानुभव घेणारे पूर्णपुरुष होते; पण नुसता ब्रह्ममायावादाचा गोंधळ घालणारे रुक्ष वेदांती नव्हते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणें ते ज्ञानी असून भक्त होते, त्यांच्या ठिकाणीं ज्ञान व भक्ति एकरूपच झालेली होती.' भक्तिप्रेमानंद त्यांनीं नुसता हृदयांतच सांठवून ठेवला नव्हता, तर त्या आनंदानें त्यांनीं विश्व आनंदमय केलें. आंत प्रेममूर्ति हरि-संचला आहे तसाच तो बाहेरही सर्वत्र कोंदला आहे असें ते नित्य पहात असल्यामुळें हा ब्राह्मण, हा शूद्र असा भेदभाव त्यांच्या मनांत वागत नसे. हरिपंडित वर्णाश्रमाचा पूर्ण अभिमानी,

कर्मठ व केवळ पंडित होता. नाथांचे हृदयाकाश व्यापक असून स्वपरभेदशून्य होते. नाथ महाभक्त म्हणून हजारों लोकांस प्रिय झाले व हरिपंडित पैठणकर विद्वान् व कर्मठ ब्राह्मणांमध्यें प्रिय झाला. हरिपंडितही स्वच्छील, व पितृभक्त होता, तथापि नाथांचे विचार न पटून तो प्रल्हाद व मेघःश्याम हे आपले दोन पुत्र व भार्या यांस बरोबर घेऊन आपल्या विचारांना विशेष अनुकूल अशा काशी-क्षेत्रांत जाऊन राहिला; आणि त्याचा राघव नांवाचा मुलगा मात्र मागें नाथांजवळ राहिला. हा राघव लहान असतांनाच आजोबांच्या तंत्रानें वागे, व नाथांच्या मागें ध्रुपद धरून उभा राही. त्याचें नाथांवर फार प्रेम होतें. हरिपंडित काशीस गेल्याबरोबर विद्वानांत मान्यता पावला व त्याला तेथें राहण्यास वाडा मिळून त्याचें तेथें चांगलें बस्तान बसलें. चार वर्षें गेल्यावर नाथ त्याची समजूत काढण्याकरितां स्वतः काशीस गेले. हरिपंडितांनीं त्यांचा मान चांगला ठेवला. कांहीं दिवस तेथें राहिल्यावर नाथांनीं महाराष्ट्र ग्रंथांवर पुराण सांगायचें नाहीं व परान्न घ्यायचें नाहीं ह्या दोन अटी बापापासून कबूल करून घेऊन हरिपंडित नाथांबरोबर परत पैठ-णास आले! याप्रमाणें कांहीं दिवस गेले. नाथांच्या ऐवजीं हरि-पंडितांचीं पुराणें सुरू झालीं. नाथही वृद्ध झाले होते, ते पुत्राचें पुराण चाललें ह्मणजे श्रोत्यांमध्यें बसत असत. हरिपंडित विद्वान्

खरे, पण नाथांच्या वेळीं जेथें मुंगीचा रीघ होत नसे तेथें कांहीं शालजोड्या मात्र चमकूं लागल्या! हा भेद हरिपंडितांच्या लक्ष्यांत येऊन आपल्या बापाविषयीं लोकांचा जो परमपूज्य भाव आहे तो दोन आणेसुद्धा आपल्या वांटचाला कां येत नाहीं याचा तो विचार करूं लागला. पूज्यता कांहीं जबरीनें मिळणारी नव्हे हें त्यास ठाऊक होतें. नाथांच्या वाड्यांत त्यांच्या दर्शनासाठीं हजारो लोक नित्य जमत असत. त्यांचा वाडा ह्मणजे मंदिरच होऊन राहिलें होतें.

३ हरिपंडितांचें हृदय जरा मऊ होत चाललें आहे हें पाहून नाथांनीं अहंकाररूपी ब्रह्मसमंधाच्या ताब्यांतून त्याला सोडविण्याचा विचार मनांत आणला. पैठणास एका बाईनें पूर्वीं देवाला सहस्र ब्राह्मणभोजनाचा नवस केला होता. कालगतीनें तिचा नवरा मरून गेला, घरांतली संपत्ति नाहींशीं झाली व तिच्यावर चार घरीं पाणी भरून पोट भरण्याचा प्रसंग आला. याप्रमाणें वाताहात झाली तरी तिच्या मनांत नवस फिटावा असें होतें. तिला एका शास्त्रीबोवांनीं सल्ला दिली कीं, ‘ एक ब्रह्मनिष्ठ जेवूं घातला तर हजार ब्राह्मणांचें पुण्य लागतें ! ’ त्यावरून तिनें मनांत योजलें कीं नाथांस जेवायला बोलवावें. नाथांच्या वाड्यांत येऊन तिनें नाथांस फार आग्रह केला, तेव्हां तिचा सद्भाव पाहून व हरिपंडितांचा अभिमान मारण्यास ही उत्तम संधि

आहे असें जाणून त्यांनीं कबूल केलें व हरिपंडितास तिच्या घरीं स्वयंपाक करण्यास पाठविलें. हरिपंडितांनीं स्वतः स्वयंपाक केला व नाथांस वाढलें. बाईला फार आनंद झाला. नाथांनीं घरीं जातांना हरिपंडितास सांगितलें कीं, 'बाईला पत्रावळ काढूं न देतां तूं स्वतः काढ!' हरिपंडितांनीं त्याप्रमाणें पत्रावळ काढण्यास प्रारंभ केला तों काय चमत्कार सांगावा! एका पत्रावळीखालीं दुसरी, दुसरीखालीं तिसरी, याप्रमाणें नाथांच्या पत्रावळीखालीं हजार पत्रावळी निघाल्या!! बाईला आपला नवस फिटला असें वाटून आनंद झाला व हरिपंडित हतगर्व होऊन बापास शरण गेले व यापुढें पित्राज्ञा हीच शास्त्राज्ञा मानून त्याप्रमाणें चालण्याचें त्यांनीं कबूल केलें. त्यांचे नाथांवरचे सर्व आक्षेप जागच्याजागीं जिराले व त्यांबरोबर अहंकार मावळून नाथांच्या कृपेस ते पात्र झाले. त्यांचा ज्ञानाभिमान गळाला व नाथांच्या ठिकाणची मनुष्यबुद्धि जाऊन नाथ ही ईश्वरी विभूति आहे अशी त्यांची खात्री झाली. पत्रावळींच्या कथेचें तात्पर्य केशवानें "म्हातारीचा भाव पूर्ण। सहस्र ब्राह्मणभोजन। पुत्रासी स्वस्वरूपज्ञान। होऊनि समाधान दीधलें' असें दिलें आहे. असो. हरिपंडित यापुढें नाथांच्या आज्ञेंत राहिला. नाथांचें कीर्तन फार दिवस कानीं न पडल्यामुळें लोक त्यासाठीं फार उत्सुक झाले होते. यापुढें नाथांचीं कीर्तनें व पुराणें पुन्हां सुरूं झालीं व पैठणास नाथांनीं केवळ भूवैकुंठ बनविलें.

४ नाथांचा वृद्धापकाळ झाला. बापलेकांचें सख्य झाल्यापासून घरांत विरोध राहिला नाहीं. नाथांचे पूर्वींचें छलक कांहीं निमाले व जे उरले ते नाथांचा अधिकार पाहून व त्यांची सर्वतोमुखीं झालेली कीर्ति ऐकून आपल्या ठिकाणीं लज्जित होऊन गेले. सहस्रकरापुढें नक्षत्रें फिक्कीं पडतात त्याप्रमाणें सर्व पंडित नाथांपुढें नम्र होऊन गेले. शके १५२१ चा फाल्गुन मास उगवला व नाथांनीं आपण लवकरच देह ठेवणार असल्याचें जाहीर केलें. त्यांना संसारपाश गृहस्थाश्रमांत शिरल्यापासून केव्हांही नव्हता. " स्वजनधनस्त्रीपुत्रांसी। नांदोनि तो नातळे त्यांसी। स्वप्न घरवात जागृत जैसी। तैसा साधूसी संसारू (भागवत अ०२६-३४६) चहूंकडचे हजारों लोक नाथांच्या दर्शनास येऊं लागले. नाथांचीं वाड्यांत कीर्तनें झालीं, नामसप्ताह सुरू झाले व पैठण नामघोषानें दुमदुमून गेलें. फाल्गुनवद्य षष्ठीचा दिवस उगवला व गुरुपूजा व ब्राह्मणभोजन आटोपल्यावर आतांच आपण देह ठेवणार असल्याचें नाथ बोलले. नाथांची प्रकृति निर्दोष होती. कुठें दुखतखुपत नव्हतें. हजारो लोक नाथांच्या सांगण्यावरून वाळवंटांत जमले. नाथांनीं शेवटचें कीर्तन केलें. त्यांच्या मुखांतील अमृताक्षरें ऐकून सारा समाज तल्लीन होऊन गेला होता. आरती झाली, खिरापत वांटली गेली. नाथ गंगेंत उतरले. त्यांनीं स्वस्थपणानें स्नान केलें. कायेनें, वाचेनें, मनानें, कोणत्याही इंद्रियानें जागृतींत अथवा सुषुप्तींत

त्यांनीं पाप केलेलें नसल्यामुळें देहावसान जवळ आलेलें असून आंत यत्किंचित् गडबड उडाली नाहीं! जन्मभर हरिवांचून आंत कांहीं ठेवलें नव्हतें, मग हरिवांचून मरणसमयीं तरी दुसरें काय स्मरणार आहे? अथवा नाथांच्या देहावसानाला मरण हा शब्द तरी लोकव्यवहार म्हणूनच लावायचा. ते मरणाही आधी मरून राहिले होते. देवगडावर गुरुसेवेंत असतांनाच जन्ममरण त्यांनीं गुरुपदीं वाहिलें होतें. जन्ममरण ज्या वासनात्मक लिंगदेहाच्या मागें लागलेलें असतें. तो लिंगदेह मागेंच भस्म होऊन गेला होता. पैठणांत किंवा पृथ्वीवर कोठेंही कोणाही मनुष्याचें कल्पनेनें सुद्धा ज्यानें अहित केलें नाहीं इतकेंच काय पण अज्ञ जीवांनीं केलेले हाल, छळ व निंदा समुद्रासारखें मोठें पोट करून ज्यांनीं जिंकून टाकले ते सकललोकसहृद्, भूतदयेचा वल्लभ व हरिभक्ताग्रणि असे श्रीएकनाथ गंगेचें स्नान करून बाहेर आले, गंगेकडे तोंड करून पाटावर बसले व कृष्णस्वरूपाचें ध्यान करीत त्यानीं परमानंदांत निमग्न असतां देह ठेवला! कोणी म्हणतात ते गंगेत गुप्त झाले. एकनाथांच्या जीवितांचें सार्थक झालें. आपल्या वयाचीं पहिलीं पंचवीस वर्षें त्यांनीं भगवत्प्राप्ति करून घेण्यांत घालविलीं व गृहाश्रमाची दीक्षा घेतल्यापासून सर्वजन्म परोपकारांत घालविला. ‘प्राणैरर्थैर्धियावाचा’ ह्मणजे आपले प्राण, आपली संपत्ति, आपली बुद्धि व आपली वाचा भूतमात्रांचें कल्याणार्थ त्यांनीं खर्चकेली व जन्माचें साफल्य केलें. पैठण-

क्षेत्रांत त्यांनीं हरि पिकवला व भूलोकाचें दुरितदैन्य दूर घालविलें. त्या सच्चिदानंदरूप एकनाथ महाराजांस माझे अनंत प्रणाम असोत.

नाथांच्या समाधीचा काळ ५१६ वर्षांमागें शके १५२१ हा सर्वत्र समजला जात असे. शके १८२६ सालीं पैठणास कांहीं जुनीं बाडें चाळीत असतांना मला नाथांचा समाधि शक नक्की ठरवितां आला व त्याप्रमाणें मी 'केसरींत' एक पत्र लिहून तो जाहीर केला. त्यावेळेपासून सर्व शोधकांनीं तो मान्य केला आहे. **नाथ शके १५२१ विकारीनाम संवत्सरीं फाल्गुन वद्य ६ रविवारीं रवी मीनगृहीं असतांना समाधिस्त झाले.** पैठणास नाथांच्या समाधी मंदिरांवर पुढील श्लोक कोरलेला आहे:—

शालीवाहन पंधरा शतशकीं एकागळे विंशती
वर्षानाम विकारि मास बरवा फाल्गून वद्यापती ।
षष्ठी वासर भानु या शुभदिनीं निर्याणस्वछंदता
पावे श्रीगुरु एकनाथचि महा स्वानंदसाम्राज्यता ॥

हा श्लोक नाथचरित्रकार केशवबोवा यांनीं रचलेला असून तो ३० वर्षांमागें ब्रह्मचारी बोवांनीं कोरलेला आहे. असेच श्लोक कृष्णदयार्णव व राघव यांच्या कवितेच्या बाडांतून दिलेले मला आढळले. कृष्णदयार्णव म्हणतात:—

भूबाहू शरचंद्रमा शकविधि क्षेत्रीं तिजा जो क्रमें ।
अब्दामाजि विकारिनामक रवी मीनगृही संक्रमें ।

षष्ठी फाल्गुन वद्य मित्रभ शशी वज्राख्य वाणिज्यता ।
पावे श्रीगुरु एकनाथ करुणासिंधु स्वसायुज्यता ॥

ह्या बाहूशरचंद्रमा ह्या श्लोकांतले 'भूबाहूशरचंद्रमा' म्हणजे १५२१ हाच शक दिलेला आहे. राघव यानें 'शके पंधराशें एकवीस । वर्षानाम विकारी त्यास । मीनगृहीं संक्रातीस । फाल्गुन वद्य षष्ठीस' असें म्हटलें आहे. ह्या तीन्ही प्रमाणांवरून नाथांचा निर्वाणशक निर्विवाद ठरतो.



# १२ स्तुतिसुमनांजलि.

नाथांच्या ह्यातींत त्यांच्या पायांवर हजारों लोकांचीं मस्तकें लवलीं व आज त्यांच्या देहावसानास तीनशेंवर वर्षें होऊन गेलीं आहेत तरी षष्ठीच्या दिवशीं दरसाल लाख दीड लाख लोक त्यांच्या सहवासानें पावन झालेल्या पैठणक्षेत्रीं जमून उच्छिष्टाच्या प्रसादाची अपेक्षा करीत त्यांच्या दारीं उभे असतात. नाथांच्या समाधीवर चवऱ्या ढाळणारे हजारो लोक आजवर होऊन गेले. राजेरजवाड्यांनीं भक्तिभावानें अर्पण केलेल्या जहागिरींत नाथसंस्थान चाललें आहे. निजाम, होळकर, भोसले, शिंदे, पवार, गायकवाड इत्यादिकांनीं दिलेलीं इनामें अजून चालू आहेत. त्यांचा विचार करण्याचें येथें आम्हांस प्रयोजन दिसत नाहीं. राजेरजवाड्यांप्रमाणें अनेक संतांनीं व कवींनीं परमप्रेमभरानें सुमनगुच्छ नाथांच्या पायांवर अर्पण केले आहेत, त्यांपैकीं कांहीं ठळक ठळक गुच्छ पुढें ठेवतों. उद्धवचिद्घन, रंगनाथ, शिवरामस्वामी, रमावल्लभदास, सिद्धचैतन्य, मुकुंद, जयरामसुत, उद्धवसुत, खंडेराय इत्यादिकांनीं केलेल्या ‘ संतमालिका ’ स्तोत्रांतून नाथांचें परमप्रेमभरानें वर्णन केलेलें आढळतें. याशिवाय मुक्तेश्वर, दासोपंत, तुकाराम, निळोबा, कृष्णदयार्णव, श्रीधरस्वामी, व्यंकटेशस्तोत्रकर्ते देवदास, एकेश्वर अवधूत, अमृतराय, आत्माराम रामदासी, मोरोपंत व

त्यांचे पुतणे बाळाजीपंत पराडकर यांनीं नाथांच्या स्तवनपर केलेलीं पद्यें पुढें दिलीं आहेत.

(१) मुक्तेश्वरः—

## पद.

भजा हो भजा माझ्या एकनाथासी
त्रिकाळीं श्रीदत्तात्रेयदर्शन ज्यासी ।
प्रतिष्ठान अधिष्ठान मान्य सर्वांसीं
प्रकट परब्रह्म भानुदासाचे वंशीं ॥ ध्रु० ॥
एकनाथा शरण जातां चुकलें भवभय
एकावांचुनि कांहीं न दिसे, अवघें अद्वय ।
एकानामें जपतां त्याची लागे निजसोये
एवढा महिमा ज्याचा वाचे वर्णितां नये ॥ भ. ॥ १ ॥
करुणेचा अवतार तो हा विश्वतारक
कळेना स्वामीचे सहजासहजें कौतूक ।
कर्ज त्याचे घरचें फेडी कमलानायक
करी देव दास्य ज्याचा आज्ञाधारक ॥ भ. ॥ २ ॥
नाम एकोबाचें गोड आवडे मना
नावडे आणीक मज कांहीं त्यावीना ।
नामामृत सेवितां भेटी झाल्या चिद्धना
नाठवे देहभान प्रेमें करितां कीर्तना ॥ भ. ॥ ३ ॥

थरथर कांपे काळ स्मरतां स्वामी समर्थ
थकित होउनि जन हे पाहती हर्षें परमार्थ ।
थकलें माझें चित्त पुरलें मनिंचे मनोरथ
थयथय नाचे मुक्तेश्वर म्हणे 'मी झालों कृतार्थ' ॥४॥

## आरती. १

जयदेव! जयदेव! जय एकनाथा! । सज्जनवृंदामाजी देखों आधिकता ॥ ध्रु० ॥ बाळपणीं कोणा डंखों आला काळ? । तो काळचि कोणा झाला कृपाळ? । जन्मारंभीं कोणाचें वैराग्य प्रबळ? । कोणाचें वैराग्य राहिलें अढळ? ॥ जय० ॥ १ ॥ क्षालन सद्गुरुपदपंकाजिचें नीर । कोण त्याला मानुनि साराहुनि सार? । कोण गुरुभक्तीसी जाहला तत्पर? । सर्वां गुरुभक्तीसी एक आधार ॥ जय० ॥ २ ॥ करतळामळ कोणी 'एकादश' केला? । विश्वव्यापक ग्रंथ कोणाचा झाला । अनंतकोटीब्रह्मांड ज्यासी अवलीळा । त्यासी 'अनुभव सार' कोणा पैं वदला ॥ जय० ॥ ३ ॥ भुसूरमहिमा कोणी वाढविला । षट्कर्मांचा महिमा अंगीं दाखविला । .... .... .... .... .... .... .... .... .... .... .... .... ॥ जय० ॥ ४ ॥ कोणाचें ऋण जाउनि कमलापति फेडी? । कोणाचें हरिदास स्वयें अंगण झाडी? । अनंतब्रह्मांडांच्या करितो घडामोडी । कोणाचे घरीं खांद्या वाहे कावडी? ॥ जय० ॥ ५ ॥ कोणें मुक्या हातीं

रामायण वदवी ? । समुद्रवलयांकित श्री कोणाची झाली ? । ऐसा अगम्य महिमा जाणति अनुभवी । भावे मुक्तेश्वर वांच्छित पद-पदवी ॥ जय० ॥ ६ ॥

## आरती. २

जयदेव ! जयदेव ! जय एकनाथा । निर्विकार ब्रह्म तूंचि तत्वता । नामें भवकुंजर ताडूनी लाथा । भक्तप्रतिपाळक काळिकाळ माथां ॥ ध्रु० नानारूपीं चाळक व्यापक तूं एक, । ह्मणुनी ‘ एका ’ नामें पाचारिति लोक । ज्याचेनि नामें न चले विषयांचा पंक । जनार्दनाजवळीं कीर्तीचा जनक ॥ जय० ॥ १ ॥ निर्मळ गोदा-तटीं मुनिराजहंस । निर्गुणप्रतिष्ठानीं केला रहिवास; । लोकत्रयीं मिरवी कीर्तीचा घोष, । आचारविचार निर्मळ निर्दोष ॥ जय० ॥ २ ॥ अपरभानुकुळीं उगवला भानू, । सूर्याचाही सूर्य दैदीप्यमानू, । काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर, मानू । कृपादृष्टी करुनि तारिसि रजरेणू ॥ जय० ॥ ३ ॥ भगवद्भावें करुनी सकळांसी मैत्री, । ह्मणुनी जन्म विश्वामित्राचें गोत्रीं, । विश्व तरलें हरिहरनामाचें मंत्रीं । पाहूं न शके जवळ काळिकाळ नेत्रीं ॥ जय० ॥ ४ ॥ ब्राह्मणतीर्थीं पूजा, नामाचा महिमा, । सत्कर्में लोटली मोक्षाची सीमा, । नाना मतांचिया वंदूनी गरिमा । मुक्तेश्वरें तेथें धरियेला प्रेमा ॥ जय ॥ ५ ॥

(२) दासोपंत—

पद.

नमो एकनाथपंत संत साधु भला रे ॥ ध्रु० ॥
प्रतिष्ठान अधिष्ठान दयाभूत अनुष्ठान ।
उतरती इतर पितर पितृश्राद्धपर्वणिला रे ॥ १ ॥
आवडिनें कावडिनें सांवडिल्या पत्रावळि ।
गंधचंदनासि घांसि नंदनंदन राबविला रे ॥ २ ॥
दत्तात्रय धरुनि दार रक्षि होऊनि चोपदार ।
चमत्कार हाचि फार दासोपंत चोजविला रे ॥ ३ ॥

(३) **तुकाराम महाराजः**—यांनीं ‘ भक्तऋणीदेव बोलती पुराणें ’ ह्या अभंगांत कबीरनामदेवांचीं उहरणें देऊन ‘ प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण । एकोबाचें रिण फेडियेलें ’ असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें टिपरीचे अभंगांत ते म्हणतातः—

ब्राह्मणाचा पोर एक खेळिया एका भला
तेणें जन खेळकर केला रे ॥ ३ ॥
जनार्दन बसवंत करुनियां तेणें
वैष्णवाचा मेळ मेळविला रे ।
एकाचि घाई खेळतां खेळतां
आपणाचि बसवंत झाला रे ॥ ४ ॥

अभंग.

शरण शरण एकनाथा। पायीं माथा ठेविला ॥ १ ॥
नका पाहूं गुणदोष। जालों दास पायांचा ॥ २ ॥
उपेक्षितां मज। तरी लाज कवणासी ? ॥ ३ ॥
तुका म्हणे भागवत। केलें श्रुत सकळां ॥ ४ ॥

( ४ ) निळोबाराय:—

अभंग.

धन्य धन्य एकनाथा। तुमचे चरणीं माझा माथा ॥ १ ॥
दासोपंताचा अभिमान। गेला होतांची दर्शन ॥ २ ॥
दत्तात्रेय चोपदार। तेथें उभे कांठीकर ॥ ३ ॥
यवन अंगावरी थुकला। प्रसाद देउनि मुक्त केला ॥ ४ ॥
निळा शरण तुमच्या पायां। अनन्यभावें नाथराया ॥ ५ ॥

( ५ ) कृष्णदयार्णव:—

ओव्या.

म्हणाल येथ कोण विचारु। तरी श्रीएकनाथ परमेष्ठी गुरु।
भानुकुळीं अपरभास्करु। अज्ञानतिमिरपरिहर्ता ॥ १ ॥
सकळसद्गुणीं परिपूर्ण। प्रतिष्ठानीं अवतरून।
कलिमलमग्ना ब्रह्मज्ञान। प्रबोधून उद्धर्ता ॥ २ ॥
अभेदगुरुभजनाची मागी। प्रकट आचरोनि दाविली जगीं।
गुरुदास्याच्या ऐश्वर्ययोगीं। समता अंगीं शोभविली ॥ ३ ॥

अद्वैतबोधीं एकात्मता । पूर्णपणें बाणली असतां ।
ते पहावया हरिहरधाता । अवधूतवेषें पातलें ॥ ४ ॥
यशोदानंदात्मज आवडी । धर्मालयीं उच्छिष्टें काढी ।
अर्जुनाचीं धुतलीं घोडीं । येथ कावडी जळ वाहे ॥ ५ ॥
अन्नगंधादि धूपदीप । अर्पणीं सादर नित्य समीप ।
यावेगळे क्लेश अमूप । करितां अल्प श्रम न मनी ॥ ६ ॥
ऐसा महिमा अगाध ज्याचा । तिहीं रुक्मिणीस्वयंवर वाचा ।
वाखाणिले त्या ग्रंथाचा । विचित्र महिमा जग जाणे ॥ ७ ॥

— हरिवरदा अ. ५२

( ६ ) श्रीधरस्वामीः—

जो भानुदासकुलभूषण । प्रतिष्ठानवासी परिपूर्ण ॥
त्या श्रीएकनाथें ग्रंथ संपूर्ण । बहुसाल कथियेले ॥

—रामविजय.

( ७ ) देवदास.—

उद्धवाचें रूप धरून । एकनाथाचें फेडिलें ऋण ॥
ऐसा उदार धीर सर्वज्ञ । तूंचि एक गोविंदा ॥

— संतमालिका.

( ८ ) एकेश्वर अवधूतः—

प्रत्यक्ष भानूनें उपदेशिला । त्याला पांडुरंगगळाच्या माळा ।
अंकुर फुटले कोरडे शूळा । त्या भानुदासचरणकमळा नमस्कार॥१॥
भानुवंशभूषण श्रीरघुनाथ । तैसा भानुदासकुळटिळक श्रीएकनाथ

जो व्यास अवतार साक्षात। जगदुद्धारार्थ अवतरला ॥ २ ॥
जो सद्गुरुभक्तीचा शृंगार । जो ज्ञानवैराग्याचें भांडार ।
जो सच्चिदानंद एकाकार। त्या एकनाथा नमस्कार एकपणें ॥ ३ ॥
जो जनार्दनस्वामीचा लाडका। जेणें भवसमुद्रीं भागवतनौका ।
घालोनि तारिले भाविकां। जो परमसखा संतांचा ॥ ४ ॥

संतमालिका.

( ९ ) अमृतरायः—

पद.

सज्जनमॅन सुमेरू गुणनिधि एकनाथ ।
परमपुरुख परमभागवत अवतरे ॥ ध्रु० ॥
नगरनमन पट्टन, तीरथमन गोदा, ।
पुलिनपर्न[2]घनतटनिकट निवास करे ॥ १ ॥
धन[3] बेंद्राबॅ[4]न, धन तरुबर कल्पवृच्छ, ।
धन्न यन चरण न सोजि अजी अरति धरे ॥ २ ॥
होत पुरानश्रवणकीर्तन मुखबिचार ।
सुख उपजत मुखतान अमृतवचन झरे ॥ ३ ॥

आत्माराम.

( १० ) रामदासशिष्यः—

अभंग.

धन्य एकनाथस्वामी गुरुभक्त । साह्य भगवंत सदा ज्यासी ॥ १ ॥

---

१ मन=मध्यें. २ पाण्याचा घांट. ३ धन्य. ४ वृंदावन. ५ पुढील अभंग धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनें मजकडे पाठविला आहे.

जेवि रामायण हरिवंश भारत । तेविं वाड चरित गाती भक्त ॥ २ ॥
श्रीगंध उगाळी पाणी आणी देव । पडलें काम सर्व संपादित ॥ ३ ॥
रुसतां स्त्रीवरी देव जाला दारा । उठविली त्वरा मेली गाय ॥ ४ ॥
प्रायश्चित्तीं पीडितां धांवला त्रिंबक । मारितां चाबूक गर्भ गर्जे ॥ ५ ॥
भागीरथीतीर्थें पाजीले खरासी । श्राद्धीं अंत्यज्यांसी अन्न दिल्हें ॥ ६ ॥
रामायण लिही वदे वायुसूत । करवी भागवत विश्वेश्वर ॥ ७ ॥
ग्रंथवाक्यें ज्याची मान्य हो समस्ता । क्रिया दासोपंता साक्षी आली॥८॥
मढें नेतां बाई हांसोनी बोलतां । कथा केले स्वतां उठोनियां ॥ ९ ॥
प्रत्यक्ष प्रगटोनी श्रीरामदासाला । परामर्ष केला यथास्थित ॥ १० ॥
धन्य ज्याची लीळा धन्य ज्याचें नाम । सखा **आत्माराम** जाला ज्याला ।

**( ११ ) मोरोपंत पराडकरः—**

नमिला शमिलास्यप्रद शांतिजलधि एकनाथ तो भावें ।
शोभावें ज्याचें यश विश्वीं ज्या देववृंद लोभावें ॥ १ ॥
भूतदया संसारीं एकोपंतास निरुपमा घडली ।
जडली आंगासींच क्षांति सदा, शांति तों गळां पडली ॥ २ ॥
अत्यद्भुत यश हरिचें जेविं तसें एकनाथपंताचें ।
तें तें साचें जें जें वर्णितसें चारित वृंद संतांचें ॥ ३ ॥
एकोपंत जनार्दनपंताचें भजनही असीम करी ।
याची मति गुरुचरणीं, भक्ष्यीं घालि न मिठी असी मकरी! ॥४॥

श्रीज्ञानेश्वर भेटे एकोबाला तसाचि अत्रिज गा ।
हें किति? दास्य करि प्रभु-ज्याहुनि आधार अन्य न त्रिजगा ! ५

ग्रंथ श्रीभागवत श्रीरामायण करी सुविस्तर तें
जरि न रचिता दयानिधि केवळ जडजीव तरि कसे तरते ? ॥६

विश्वेश्वर अविमुक्तीं, विठ्ठल पंढरपुरीं, प्रतिष्ठानीं ।
प्रभु एकनाथ, वरिला सर्वमहितदैवतप्रतिष्ठांनीं ॥ ७ ॥

ज्या पैठणांत षष्ठी, तो संसारीं कधीं नव्हे कष्टी ।
हे स्वस्थाना नेते, रक्षुनि अंधाबळा, जशी यष्टी ॥ ८ ॥

मातेचे पाय जसे छळ करित्याचे तसेचि जो पाहे ।
साधु निवे, नच कोपें, न दुरुक्तक्षोभ मानसीं राहे ॥ ९ ॥

जों जों प्रायश्चित्त ब्राह्मण आग्रह करूनियां देती ।
तों तों साधुमनांत प्रीति, न चतुराननींहि नांदे ती ॥ १० ॥

हस्तीं धन आलें जें तें देवब्राह्मणांसि अर्पावें ।
स्वापत्य तसें प्रेमें अन्नार्थि प्राणिजात तर्पावें ॥ ११ ॥

भक्तवश त्यक्तप्रभुभाव नव्हे पांडुरंग देव कसा ? ।
बारा वर्षें वसला एकोबाच्या गृहांत सेवकसा ! ॥ १२ ॥

प्रभुरूप प्रभुभक्त स्पष्ट, म्हणुनि एकनाथ हा भावें ।
स्तविला भक्तमयूरें कीं येणें सर्व इष्ट लाभावे ॥ १३ ॥

## ( ११ ) बाळाजीपंत पराडकरः—

शुक भवनिधि तरले, परि योगालाबू धरूनियां पोटीं ।
एकोबाही तरले, भवप्रस्तर दृढ धरूनियां पोटीं ! ॥ १ ॥

शुकसम जेणें केले विकारारिपु हे अनाथ संतत सा ।
भवसिंधुसेतु तो कां न ध्यावा एकनाथ संत कसा ? ॥ २ ॥

श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें कारितो ।
स्वकरें चंदन घांसी, गंगेचें पाणि कावडी भारितो ॥ ३ ॥

